**पात्रें —**

**रेखा :** कॉलेजांत जाणारी रा. ब. बाबासाहेबांची तरुण कन्या.

**शकू :** रेखाची मध्यम वर्गातील अेक मैत्रीण.

**यमू :** रंगरावाने टाकून दिलेली तरुण दुर्दैवी स्त्री.

**अवंतीबाअी :** समाजसेवा करणारी अेक सुशिक्षित प्रौढ स्त्री.

**चंद्राबाअी :** बाबासाहेबांची तरुण नाचरी पत्नी.

**म्हाळसाबाअी :** चंद्राबाअीची जहांबाज आअी.

**माणिक** व **रतन :** दोन तरुण मुली.

**सखू :** बाबासाहेबांच्या घरची मोलकरीण

**नाटिकेला लागणारा वेळ**
**२ तास व ३० मिनिटें**

# "नव्या वाटे"ची सुरवात

**प्रस्तावना-लेखिका**

## सौ. अिंदिराबाअी नातू

अध्यक्ष– महिला स्नेहसंवर्धक मंडळ, पुणें.

"वहिनी, आज ऑक्टोबरची २२ वी तारीख आणि अद्याप तुम्हीं नाटकासंबंधी कांहीच कसं बोलत नाही ? यंदा आपलं बारावं संमेलन नाटकाशिवायच साजरं करण्याचा रंग दिसतोय् तुमचा !" आमच्या सेक्रेटरी मला म्हणाल्या.

संध्याकाळीं खेळणं झाल्यावर थोडा वेळ तरी आम्ही विशेष जिव्हाळ्याची मंडळी गप्पा मारीत बसतों. त्या दिवशींच्या गप्पांना चांदणें व भेळ या दोन्हींमुळे विशेषच रंग चढला होता. तथापि त्यांना गप्पा म्हणण्यापेक्षा आगामी संमेलनाच्या कार्यकारी मंडळाच्या चर्चेचें स्वरूपच आलें होतें.

"हें पाहा, गेले पंधरावीस दिवस मी सारखी प्रयत्न करतें. कितीतरी नाटकं वाचलीं; वेगवेगळ्या लेखिकांना विचारलं; पण मला अद्याप कांही मनासारखं जुळलं नाही. म्हणून मीं अेक निराळाच प्रयत्न करून पाहायचं टरवलं आहे. 'स्त्री'च्या लेखिका आनंदीबाअी किर्लोस्कर यांच्या गोष्टी वगैरे वाचून त्यांच्या लेखनाविषयी माझं मत फारच छान झालं आहे. आपल्या मुख्य तत्त्वाप्रमाणं स्त्रीजीवनांतील कांही विषयांवर प्रकाश पाडणारं नाटक लिहून मागणार आहें मी त्यांच्याजवळ. आणि कोल्हापुराहून येतांना बहुधा वाडीला जाअून त्यांना भेटणारहि आहे. पाहूं काय होतं. जास्तींत जास्त काय ? त्या 'नाही' म्हणतील ! अितकी मनाची तयारी असली म्हणजे झालं."

त्याप्रमाणे मीं लगेच त्यांना पत्र लिहिलें व माझ्या अपेक्षेप्रमाणे आनंदीबाअींकडून अत्यंत सौजन्यपूर्ण भाषेंत मला जवळजवळ होकाराचें पत्र अुलट टपालींच आलें. त्यांनी लिहिलें होतें, "मीं अद्याप अितकं मोठं व अशा तऱ्हेचं नाटक लिहिलं नाही व त्या लेखनाच्या तंत्राचा अभ्यासहि केलेला नाही. तेव्हा मला जरा भीति वाटते. तरीहि मी प्रयत्न करून पाहणार आहें." अर्थात् मीहि विमा-अेजंटाच्या चिकाटीने मला पाहिजे असलेल्या नाटकाच्या बारीक-सारीक तपशिलासंबंधी लिहून प्रामुख्याने हें कळवलें होतें, की नाटक आपल्याकडून येणार व तें आम्ही करणार याविषयी माझी खात्री झाली आहे.

मला ८ डिसेंबरला पूर्ण नाटक हवें होतें. पण १ डिसेंबर अुजाडली तरी आनंदीबाअींनी कबूल केल्याप्रमाणे पहिला अंकसुद्धा माझ्या हातीं आला नव्हता! मनांत सारखी धागधूग होत असतांना सर्वांच्या प्रश्नाला नाना तऱ्हेचीं अुत्तरें देत मी वेळ काढीत होतें. पण अगदी किर्लोस्करांच्या व्यवस्थितपणांत ८ डिसेंबरला मला नाट-काचें रजिस्टर पार्सल मिळालें. नाटक आल्याबरोबर अगदी अेका दमांत मीं तें वाचून काढलें. आणि काम करण्याला ज्यांना खूप वाव आहे अशीं दोन पात्रें सखू व चंद्रा मला फारच आवडलीं. शिवाय अगदी त्या कामाला योग्य अशा दोन सभासदांचीं नांवें माझ्या अेक-दम लक्षांत आलीं.

त्याच दिवशीं अितरहि सहभगिनींना मीं नाटक वाचायला दिलें. नाटक पाहिल्याबरोबरच प्रामुख्याने दोनतीन गोष्टी लक्षांत आल्या. संवाद अतिशय सुटसुटीत आणि ठसकेदार, नाटकाला सामुग्री अत्यंत थोडी, अंकाची रचना अेखाद्या क्लबाने नाटक करण्यास अत्यंत सोयीची व सर्व पात्रांना स्वतःचें कौशल्य दाखविण्यास पूर्ण वाव, विषय अगदी घरगुती व व्याख्यानें अगदी थोडीं, पात्रें फार

नसल्याने बसवण्यास फार सोपें, अगदी अुच्च तत्त्वप्रदर्शनहि नाही किंवा ओढूनताणून पांचटपणाहि केलेला नाही.

आनंदीबाअी नाटक लिहून आपल्या जबाबदारींतून अंशतः मोकळ्या झाल्या. पण मी? आता सर्व माझ्यावर येअून पडलें. अेखादें नाटक कितीहि चांगलें लिहिलें असलें आणि तें जर अुत्तम न बसलें तर प्रथमच त्याविषयी अगदी वाअीट मत होतें. तसें या नाटकाचें होअू न देण्याची जबाबदारी माझ्यावर होती. नाटकांत कामें करणाऱ्या सर्व सभासद पक्क्या संसारी स्त्रिया. त्यांतच मंडळाच्या चित्रपटाकरितां हि मधूनमधून खोटी व्हावयाची. जानेवारी १५ पर्यंतसुद्धा आम्हां लोकांच्या हातांतल्या वह्या सुटल्या नव्हत्या. अर्थात् अभिनय बसणें अशक्यच. तरीहि नाटक अुत्तम बसत असल्याबद्दल मी आनंदीबाअींना दर आठवड्याला पत्र लिहीत होतें. पण हा भ्रमाचा भोपळा शेवटीं फुटणार तर नाही ना, ही धास्ती मला चिंतातुर करीत होती. तथापि शेवटच्या आठवड्यांत हें शैथिल्य जाअून नाटक अुत्तम बसवण्याची सर्वांनी पराकाष्ठा केली. गाण्याबद्दल आनंदीबाअी दर पत्रांत विचारीत व फक्त त्या प्रश्नाचें अुत्तर टाळून मी अितर सर्व लिही. कारण आमची गाण्याची बाजू अगदीच लंगडी होती. नाटक अुत्तम बसलें तर गाण्याशिवाय काम मारून नेतां येतें, हा माझा दोनतीन वर्षांचा अनुभव होता. यमूचें भावनापूर्ण गाणें जर अुत्तम बसलें तर नाटकाची गोडी वाढेल हें मला माहीत होतें; म्हणून आम्हीं त्याकडे थोडें जास्त लक्ष दिलें. गाण्याचें नोटेशन वगैरे आनंदीबाअींनी अितकें अुत्तम करून पाठवलें, की कांही तज्ञांनी त्याचें कौतुक केलें.

नाटककाराच्या जिव्हाळ्याचा विषय म्हणून तो जीं पात्रें रंगवतो त्यापेक्षा कधीकधी पोषाख, भाषणें वगैरेंनी भडक दिसणारीं पात्रेंच सर्वसामान्य प्रेक्षकांचीं मनें आकर्षून घेतात. यंदाहि 'नव्या वाटा' म्हटलें की यमूच्याअैवजी चंद्राचीच सर्वांना आठवण येते.

ता. २९ जानेवारीला आम्ही रंगीत तालीम घेणार होतों व दुसरा दिवस फक्त आनंदीबाअींना सर्व नाटक दाखवायचें व त्यांच्या सूचना अैकायच्या असें आम्हीं ठरवलें होतें. पण प्रथमापत्याला पाहण्याच्या मातेच्या अुत्सुकतेने आनंदीबाअी ता. ३० च्या अैवजी २९ लाच सकाळीं किर्लोस्करवाडीहून माझ्याकडे आल्या. येणाऱ्या पाहुण्यांपैकी आनंदीबाअींची व्यवस्था माझ्याकडे सोपवण्यांत आली होती. कारण आनंदीबाअींच्या विवाहामुळे त्यांच्याविषयी बऱ्याच भगिनींनी विचित्रच कल्पना करून घेतल्या होत्या. मी त्यांना म्हणे, " पाहा बरं ! तुमचीं हीं मतं तुम्हांला कदाचित् बदलावी लागतील. माझ्याशीं झालेल्या पत्रव्यवहारावरून तरी त्या मला अगदी मनमोकळ्या आणि प्रांजल वाटतात. " आणि अखेर तसेंच झालें. अवघ्या चारपांच दिवसांच्या अवधींत त्यांनी प्रत्येकाला अितकं आपलेंसें केलें, की त्यांच्या अकालीं मृत्यूने सर्वांना चांगलाच चटका लावला.

त्याच रात्रीं रंगीत तालीम वरींच अगदी घरगुती स्वरूपांत झाली. माझं लक्ष तालमीपेक्षा आनंदीबाअींच्या चेहऱ्याकडेच जास्त होतें. त्यांना नाटकाविषयी काय वाटतें आहे याची मला सारखी काळजी वाटत होती. तालीम संपल्यावर त्या जेव्हा अगदी मोकळे-पणाने हसल्या तेव्हा मला जरा हायसें वाटलें. " नाटक अगदी छान बसलं आहे हो ! पण कांही किरकोळ सूचना मला करायच्या आहेत; त्या अुद्या तालमीच्या वेळीं करीन. " असें म्हणून त्या आपल्या माहेरीं गेल्या. दुसरे दिवशीं अगदी थोड्या वेळांत त्यांनी साभिनय कांही गोष्टी स्वतःच शिकविल्या.

सूचना होत्या थोड्याच; पण अत्यंत मार्मिक आणि आवा-जाच्या व अुच्चाराच्या थोड्याशा वेगळ्या प्रकाराने भाषणाची पकड घेणाऱ्या. आणि त्यांनी अशा स्वरूपांत त्या सांगितल्या, की अुरलेल्या अेका दिवसांत लोकांनी त्या प्रयत्नपूर्वक आत्मसात् कराव्यात. त्यांच्या

अंगीं असलेलें कार्यकर्त्याचें कौशल्य या वेळीं आम्हांला आपोआप दिसून आलें.

नाटकाचा दिवस अुजाडला. सनअीच्या मंजुळ आवाजांत नाटकाचा पडदा वर गेला. रेखेची आअी, तिच्या मैत्रिणींचीं विवाहाच्या बाबतींतील मतें, यांत प्रेक्षक रंगूं लागतात तोंच अंकाचा शेवट आला व म्हाळसाबाअींनी आपल्या प्रवेशाबरोबरच केलेल्या भाषणाने व दृष्टीने सर्वजण चकित व पुढील अंकाविषयी अत्यंत अुत्सुक झाले. खऱ्या कुशल लेखकाचें मर्म प्रेक्षकांचें औत्सुक्य कायम टिकण्यावरच असतें. आणि तें आनंदीबाअींनी या अंकाच्या शेवटीं पुरेपूर साधलें. पहिल्या अंकाविषयी मनांत पुरते विचार येतात न येतात तोंच सर्वांना हसून मुरकुंड्या वळविणारा म्हाळसाबाअी, चंद्रा वगैरे पात्रांचा प्रवेश सुरू झाला. सख्खू, म्हाळसाबाअी आपल्या अभिनयाची तर कमाल करीत होत्या या अंकांत. चंद्राचा प्रवेश तर अितका बहारदार वठला, की लोक अगदी खूष झाले. तिसऱ्या अंकाच्या वेळीं मात्र हॉल अगदी स्तब्ध होता. कारण कधी यमूच्या स्थितीने मन अस्वस्थ होअी, तर कधी 'बरी जिरली म्हाळसाबाअीची!' असें वाटून किंचित् हायसें वाटे लोकांना. अवंतीबाअींच्या भाषणाने प्रौढ कुमारिकांच्या प्रश्नाकडे मन वळे, तर त्यांनी दिलेला सल्ला अैकून यमू वागली यामुळे तिची करुणा येअूनहि मन 'नव्या वाटां'च्या आगमनाने किंचित् दचकल्यासारखें वाटे. हा सबंध अंक वेगवेगळ्या विचारांच्या आंदोलनांत गेला असें प्रेक्षकांकडे पाहणाराला दिसून येत होतें. मात्र विवाह मंडळांतील सर्वच सभासदांचीं लग्नें जमल्यावर सुरू झालेल्या चेष्टेने पुन्हा खेळकर वातावरण निर्माण झालें व शेवटीं टाळ्यांच्या कडकडाटांत शेवटचा पडदा पडला.

नाटकगृहांत आम्हीं अध्यक्षांजवळ आनंदीबाअींच्याकरिता जागा ठेवली होती. पण त्या अेक मिनिटभरहि अेका जागीं थांबल्या नाहीत.

वेगवेगळ्या ठिकाणीं बसून सारख्या लोकमत अजमावीत असाव्यात. माझें लक्ष सारखें त्यांच्याकडे होतेंच. नाटकाला आलेल्या कांही भगिनींशीं त्यांची पूर्वीचीच ओळख होती व अितर बऱ्याच नव्या लोकांची ओळख मीं करून दिली. असें सुटसुटीत व चटकदार नाटक लिहिल्याबद्दल बऱ्याच मंडळींनी त्यांचें अभिनंदनहि केलें. नाटक संपलें तेव्हा आनंदीबाअी बाहेर अुभ्या होत्या. त्या वेळीं आमची जी दृष्टिभेट झाली त्यांतच आम्हां दोघींचें किती समाधान झालें हें आपोआप व्यक्त झालें.

दुसरे दिवशीं आमचा मुख्य समारंभ होता. त्याच वेळीं मंडळा-तर्फे नाटकाची आठवण म्हणून त्यांना अेक भेट देण्यांत आली व हार घालून त्यांच्या लेखनकार्याबद्दल त्यांचा गौरव करण्यांत आला. त्या वेळीं त्यांना कांही विशेषच वाटलें असावें. त्यांची ती त्या वेळची नजर मी कधीच विसरणार नाही. त्यांच्या मृत्यूनंतर श्री. शंकररावांनी मला पाठवलेल्या पत्रांतहि त्या प्रसंगाच्या वेळच्या आनंदीबाअींच्या मनःस्थितीचें वर्णन केलें आहे. त्या वेळचें त्यांचें भाषणहि छोटें-सेंच पण औचित्यपूर्ण झालें.

दुसरे दिवशीं रात्रीं त्या वाडीला परत गेल्या. आम्ही त्यांना स्टेशनवर पोचवण्यास गेलों होतों. त्या वेळीं त्यांनी सर्वांना वाडीला येण्याबद्दल आमंत्रण केलें व अगदी गाडी सुटतांना— "आता ही आपली अखंड मैत्री हं !" असें म्हणाल्या. तीच त्यांची माझी शेवटची भेट ! "मरगी"च्या केसच्या वेळीं त्या आल्या होत्या; पण आमची भेट होअू शकली नाही. फोटोसंबंधी वगैरे त्यांचीं पत्रें आलीं; पण योगा-योग असा मजेदार, की "नव्या वाटां"तील परिचय-मंडळांत लग्न जमवणाऱ्या मुलींचीं लग्नें संमेलनानंतर अवघ्या महिन्याच्या आंतच झालीं आणि नाटकांत कामें केलेल्या सर्व सभासदांचा फोटो कांही मला त्यांना पाठवता आला नाही. वाडीला गेल्यानंतर त्या पहिल्याच

पत्रांत त्यांनी मला लिहिलें होतें, "येथे चंद्राच्या कामाबद्दल फार धास्ती वाटत होती. पण मीं जेव्हा सांगितलें तेव्हा लोक फार खूष झाले." आणि खरोखरच आमच्या सर्व सभासदांनी कामें अगदी प्रयत्नपूर्वक अुत्तम केलीं.

चंद्राचा वेगवेगळा अभिनय तर सौ. विमलाबाअी साठे यांनी अुत्तमच वठवला. रेखाच्या काळजीनें झुरणाऱ्या सखूच्या वेषांतील गाऽगीळांना ही रेखाच्या घरची पिढीजात मोलकरीण नाही असें कोणीहि म्हणणें शक्य नव्हतें. संसारला आसावलेली व रूढीनें गांजलेली यमू– रानडे बरोबर डोळ्यांसमोर अुभी करीत, तर भग्नहृदयी पण कर्तव्य-परायण प्रौढ कुमारिकेचा आदर्श पटवर्धन पटवून देत. आपल्या भावी पतीच्या आपल्या घरीं होणाऱ्या पहिल्याच भेटीच्या वेळची प्रणयी जिवाची धांदल गोडबोले रेखेच्या भूमिकेंत गोडव्यानें वठवीत, तर श्रीमंताची सासू म्हणून म्हाळसाबाअीच्या अवतारांत होणाऱ्या पहिल्याच प्रवेशाबरोबर बापट प्रेक्षकांच्या मनावर छाप टाकीत. फडके, सोहनी, पेंडसे या परिचय-मंडळांतील सभासदांनीहि प्रेक्षकांकडून धन्यवाद मिळवले.

तीनचार दिवसच होत्या आनंदीबाअी. पण त्या अितक्या मोकळे-पणानें वागत होत्या, की जशी कांही त्यांची आमची जुनी मैत्री आहे. मंडळाच्या वाचनालयाला संमेलनाच्या अध्यक्ष सौ. गंगूताअी पटवर्धन यांनी कांही पुस्तकें दिलीं, त्या वेळीं आनंदाबाअीहि होत्या. प्रचलित वाङ्मयावर आमचा खूप मजेदार वादविवाद झाला. आनंदीबाअींनी संपादनकार्यांत येणारे कितीतरी मजेदार अनुभव त्या वेळीं सांगितले. त्यांच्या वाचनाचीहि मला त्याच वेळीं प्रथम संपूर्ण कल्पना आली. खूप दांडगें असावें त्यांचें वाचन.

अितर नाटक जरी सर्वांना खूप आवडलें तरी यमूच्या दुसऱ्या लग्नाची गोष्ट मात्र फारच थोड्यांना पचवतां आली. कांहींनी मला स्पष्टच म्हटलें, की "आनंदीबाअींनी स्वतःच्या लग्नाचें समर्थन करण्याकरिता हा प्रयोग केला आणि तुम्हीं त्याला अुत्तेजन दिलं.

हाच आदर्श आता लोकांनी पुढें ठेवायचा का ? तुमच्या कलबापासून आम्ही आजपर्यंत कांही वेगळीच अपेक्षा करीत होतों; पण तुम्हीं त्यावर बोळा पुसलांत!" मीं म्हटलें, "आनंदीबाओंनी नाटक लिहिलं म्हणजे ह्या गोष्टी सर्वांनी केल्याच पाहिजेत असा कायदा तर झाला नाही ना लगेच? प्रत्येकाला स्वतःचं मत लिहायलासुद्धा परवानगी नाही का? नवीन कायदे करणार तेव्हा तुमच्या मतनोंदणीचा प्रश्न येओील, त्या वेळीं त्या ठरावाला विरोध करा हं."

परंतु माझ्या स्वतःपुरतं पाहिल्यास मला यमूच्या विचारसरणींत किंवा तिला मिळालेल्या सल्ल्यांत यत्किंचितहि दोष दिसत नाही; व पूर्वग्रहदूषित न होतां पूर्ण विचार केल्यास कोणालाहि असेंच म्हणावें लागेल. खरोखरीच अशा स्त्रियांची संख्या समाजांत अितकी वाढलेली आहे, की त्यांना योग्य पाठबळ मिळालें तर त्या यमूच्या मार्गाचा अवलंब केल्याशिवाय कधीच राहणार नाहीत. अशिक्षित मुली विकाराच्या किंवा चैनीच्या आहारीं जाअून किती दुर्दशा करून घेतात किंवा पूर्ण पटलें तर नितक्याच धडाडीने कशा मागे फिरतात याचें अुत्कृष्ट अुदाहरण चंद्रा हें आहे. तिच्या स्वभावाच्या अगदी बारीकसारीक छटा आनंदीबाअींनी फार च मार्मिकतेने रंगवल्या आहेत. मी कांही साहित्यिक नाही किंवा या सर्व गोष्टी तंत्राच्या दृष्टीने कशा दिसतात हेंहि मला सांगणें शक्य नाही; पण सर्वसामान्य माणसाला या नाटकाविषयी जें काय वाटेल तेंच मीं लिहिलें आहे.

या नाटकाच्या जन्माची हकीगत सांगण्याचें काम माझ्याकडे आलें, त्याचें कारण बाअींनी नाटक लिहावें ही मूळ कल्पना माझी होती. अर्थात् त्यांच्या लेखनकार्याला साजेशा स्वरूपांत त्याच्या अवताराची कहाणी सांगणें मला कसें शक्य आहे? त्याला अेखाद्या तज्ज्ञ लेखकाची जरुरी होती. परंतु कांहीतरी योगायोग असतोच ना? अेखादा मनुष्य स्वपराक्रमाने मोठा झाला तरी त्याची आअी असतेच की: तद्वतच हें!

★ ★ ★

# नव्या वाटा

## १

(रेखेची खाजगी खोली. एका टेबलावर प्रसाधन-साहित्य मांडलेलें आहे. दुसऱ्या बाजूला चौरस टेबल असून त्याच्या तिन्ही बाजूंना वेताच्या खुर्च्या मांडल्या आहेत. भिंतीवर मध्यम वयाच्या एका स्त्रीचा हार घातलेला फोटो आहे. थोडक्यांत वर्णन करावयाचें तर एका सुखवस्तु कुटुंबांतील कॉलेजकुमारीची खोली जशी असेल तशीच ही खोली आहे. पडदा वर जातो त्या वेळीं रेखा स्वतःशींच एक पद गुणगुणत केशरचना करीत असते.)

(राग—मिश्र काफी. त्रिताल)

**अवतरली पौर्णिमा सुखाची**
**सुफलित झाली आस मनिची ॥ ध्रु० ॥**
**प्रीतिचा फुलबाग बहरला**
**सुखकर सुमधुर गंध विखुरला**
**अमु वसंतची पातला ॥ १ ॥**

**रेखा**—सखू, ए सखू ! येऊन गेला का ग पोस्टमन ? अं ? गेलं की नाही तिला ऐकूं ? सखू, करतेस काय तिकडे ? (पडद्यांतून

सखू– "..न्हाओी व अजून तरी. पन बघतें भाअिर कुटं दिसतुया का!")
अजून कसा बाओी आला नाही पोस्टमन? दहा वाजून गेले. का पाठव-
लंच नाही सुरेशनं अुत्तर?

**सखू**– (प्रवेश करून) घ्या हें ताओी तुमचं पत्तर! (रेखा गडबडीनें तें पाकीट तिच्या हातून घेते व फोडून वाचूं लागते. आंतून पत्रासोबत अेक फोटो निघतो. तो ओझरता पाहून टेबलावर टेवते.) बाबासायबांचं पत्तर हाय जनू? (रेखा पत्रांतून डोकें वर काढून तिला ' बोलूं नकोस ' अशी खूण करते.) ममअीहून क्वासं परत येनार म्हनत्यात?

**रेखा**– (व्यत्ययामुळे त्रासून) सखू, जा पाहूं तूं आपल्या कामाला. अिथं अुभी राहूं नको.

**सखू**– आत्ता! मी काय करतीया तुमास्नी? पर बाबासायबांचं पत्तर असंल म्हनून अुबी ऱ्हायली मी! मावशीबायची खुशालीबिशाली लिवलीय का ऱ्हाय त्यांत? लअी चांगली मावली. आमच्या मालकिनीची भन कशी सोभून दिसतीया! ग्येल्या सालीं हतं आली व्हती, तर जातांना मला पांच रुपय अन् येवढ्या धडीचं लुगडं देअूनशेनी गेली अन् जातांना म्हनतीया कशी– 'सकू, वळकबिळक ठीव बरं का. आन् माज्या रेकाताअीला जप चांगली. तिची आओी बिचारी ग्येली, पर तूं हायीस घरच्यासारखी.' आन टचाचून पानी आलं बगा बिचा-रीच्या डोळ्याला! (स्वतः डोळ्याला पदर लावते) आन् मला मम-अीला बी बलावलंय् तिनं अेकदा!

**रेखा**– सखू, काय ग चालवली आहेस सारखी बटबट? थांब, मी आंतच जातें कशी. (जाते)

**सखू**– (तिच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पाहात व हसत) अिकती मोटी झाली, शिकायपायीं कालीजांत ग्येली तरी पोरपन काय ग्येलं नाय आमच्या ताओीचं! बरं पन आपन् आता खोलीचा कचेर काढाया व्होवा. (झाडलोट सुरू करते)

**शकुंतला**– (प्रवेश करून) कोण सखू, रेखाताओ आहेत का ग घरांत?

**सखू**– ताओ व्हय? हैती की! बसा. येतील अिकल्यात हकडं!

**शकुंतला**– (खुर्चीवर बसली असतां टेबलावरच्या फोटोकडे तिची नजर वळते. तो अुचलून घेअून) अगबाओ! कुणाचा ग सखू हा फोटो?

**सखू**– (शकुंतलेच्या हातून तो फोटो घेअून चार पावलें दूर जाते) ह्यो तर कुणी बापओ दिसतुया तरना बांड! आत्ताच्या पाकिटां-तून आल्यावानी दिसतुया. (स्वगत) हा, हा! असंच असंल. बाबा-सायबांनी हा न्हवरा बगितलाय जनु ताओस्नी. म्हनूनच यवढं झाक-झाकूनशेनी वाचत होती बरं का त्यें पत्तूर! (अुघड) तुमालाच न्हाओ का वळकत कोन हाय ह्ये?

**शकू**– काय बाओ ओळखणार? कुणा तरुण मुलाचा फोटो आहे येवढं खरं.

**सखू**– नाय वळकत? हात् तुमची! मला आडानी बायकुला जें कळलं तें तुमा तरन्या पोरीस्नी वळकना? अन् तुमावानी लग्नाच्या पोरींना तर असल्या गोष्टी चट्‌दिशी अुमगाया होवत.

**शकू**– म्हणजे? रेखेच्या भावी नवऱ्याचा का फोटो आहे हा? खरंच, बघूं.

**सखू**– हंग अशी. आता कशी चालली बुध? पर सकूताय, कसा हाय नवरा सांगा बरं?

**शकू**– वा! छानच आहे. पण कधी ठरलं हें लग्न?

**सखू**– त्यें काय मला समजलं नाय. पर आता बाबासायबांचं पत्त्र आलंय, त्यांतून हा पोट्टू आलाया जनू. ताओ गेल्यात अिसरून. (जरा विचार करून) असूंदे. मी त्यो दडवून ठिवून वाअिच गंमत करनार हाय. बसा तुमी! येत्याल ताओ अिकल्यात. पर त्येस्नी सांगं नगा हां मीं घ्येतलाय ह्यो पोट्टू म्हून. (जाते)

**रेखा**– (प्रवेश करून) सखू, अे सखू ! गेली वाटतं कुठं निघून ! (शकूकडे पाहून) अगबाअी ! शकू, तूं ग केव्हा आलीस ?

**शकू**– आलें मघाशीच. पण तुझा कुठंय अिथं पत्ता? कसल्या ग नादांत आहेस येवढी? अन् तें पत्र कसलं हातांत? त्यांतच रंगली होतीस वाटतं अेवढी ? सांग तरी आम्हाला येवढी काय जंमत आहे ती ?

**रेखा**– (गडबडीनें) कुठं ग? कांही नाही. अुगीच काय !

**शकू**– बरं बाअी, नको सांगूं. झालं ?

**रेखा**– अग, आहे काय सांगण्याजोगं? माझ्या मुंबअीच्या अेका मैत्रिणीचं पत्र आहे हें. (टेबलाजवळ जाअून) अगबाअी! पण फोटो काय झाला? अिथं टेबलावरच तर ठेवला होता. म्हणजे भुताटकीच झाली म्हणायची ! अिश्श ! सखू, अग सखू...(सखू प्रवेश करते.)

**सखू**– काय ताअी ?

**रेखा**– अग, मघाशी अिथं या टेबलावर फोटो होता अेक मीं ठेवलेला, तो तूं पाहिलास का ?

**सखू**– म्या ? म्या कशाला बगू, तुमचा पोट्र का काय त्यें ! अन् मला काय समजतंया त्यांत ? मीं आपली समदीं चिट्टीं अन् क्येर गोळा केला अन् निगुनशेनी गेलें.

**रेखा**– अग, म्हणतेस तरी काय? मग केरांतून नेलास की काय तो ? टाकलास कुठं बाअी केर? अग, सांग ना लवकर. (सचिंत होते)

**शकू**– काय झालं ग? कशाचा फोटो ? जरूरीचा होता वाटतं कसला? सखू, सांग बाअी लोकर केर कुठं टाकलास तो.

**सखू**– कुटं म्हंजी? क्येराच्या टोपलींत.

**रेखा**— ( हताशपणें ) चांगलं ! सखू, काय केलंस हें ? ( खुर्चीत अंग टाकते )

**सखू**— पर ताअी, कसला पोट्ट व्हता यवढा जरुरीचा, हें तरी सांगा की. ( कृत्रिम चिंता दाखविते )

**रेखा**— काय सांगूं तुला कपाळ !

**सखू**— तसं नव्हं. पर तसं काय जरुरीचं असंल तर हुडकून आनीन म्हणत्यें. हाय कुनाचा पोट्ट ? बाबासायबांचा का मावशींचा ? खून सांगा मंजी हुडकाया बरं.

**रेखा**— आता हुडकून आणणार ना कचऱ्याच्या पेटींतून ? शहाणीच पडलीस मोठी ! बाकी तुझ्यावर रागवून काय अुपयोग म्हणा ! माझंच चुकलं ! सखू, कशाला येतेस नाही त्या वेळीं कडमडायला माझ्या खोलींत ? जा, चालती हो !

**शकू**— तिच्यावर रागावतेस कशासाठी ? तूं तरी असा वर वाटेल तिथं टाकलास कशाला ? आपल्या अगदी जवळ ठेवायचा नाही ?

**रेखा**— तेंच तर चुकलं ना. पण आता काय त्याचं ? बघितलादेखील नाही मीं डोळे भरून वाचण्याच्या नादांत !

**शकू**— सखू, बघ ग कुठं सापडतोय् का. बिचारी अगदी रडकुंडीला आली आहे हो. वाटलं तर अुद्या म्युनिसिपालिटीच्या माणसाला चार आणे देअून पेटी अुपसायला लाव केराची.

**सखू**— ( स्वगत ) आता मात्र लअी बिगडली बरं का ताअी ! ( हळूच पदराखालून फोटो काढून रेखेपुढे धरीत ) बरं, ह्यंच आहे का बगा बरं.

**रेखा**— ( ताड्कन् अुभी राहून ) सखू, काय द्वाड आहेस ग तूं ? लपवून ठेवला होतास ना ? चल, आण अिकडे.

**सखू**— कुनाचा हाय सांगा अदुगर ? त्याबिगार नाय देनार.

**रेखा**– आहे असाच कुणाचा तरी. तुला ग काय करायचंय् तें ? दे आता चटकन्.

**सखू**– तर तर ! म्हनं कुनाचा तरी ! मला जनु त्र्व्ळकताच येत नाय् ! कुनाच्या तरी पोट्ट्यासाठी जीव टाकत्यात व्हय मानसं ? हवा असल पोट्ट तर खरंखरं काय त्यें सांगा.

**शकू**– सांगेनास रेखाताअी काय खरं असेल तें. त्याची अेवढी चोरी कशाला ?

**रेखा**– वा ! शकू, तूं तरी हिला सामीलच दिसतेस ! असा दोघींचा कावा आहे होय ग ? बरं तर. हें बघ, हे फोटोंतले गृहस्थ किनअी, आमच्या कॉलेजांतच आहेत.

**शकू**– अस्सं !

**सखू**– नांव काय त्येंचं ?

**रेखा**– नांवाशीं ग काय करायचंय् तुला ?

**सखू**– तुमच्या तोंडून अैकाया ग्वाड वाटतंय्, दुसरं काय ? अन् तसं नग बरं का. आणा घेअून.

**रेखा**– चल वात्रट कुठली ! नांव घ्यायला माझं लग्न का झालंय् त्यांच्याशीं ?

**सखू**– झालं न्हाअी पन् व्हायचं ठरलंय् ना ? आता का लाजून त्वांड फिरवतायसा ? हं. सांगा झटपट.

**रेखा**– बरं बरं. शहाणी आहेस फार !

**शकू**– अिश्श ! रेखा, नांवाला ग काय लाजतेस अितकी ? सांग ना.

**रेखा**– बरं बाअी. ‘ सुरेश ’ नांव त्यांचं. झालं आता समाधान ? दे आता फोटो.

**सखू**– माजं समाधान पोट्ट बगितला तवाच झालंय्. कसा राजबिंडा दिसतुया अगदी. हं, हये घ्या. ( फोटो देते. तो अधीर-



म्हाळसाबाअी– “ ही... तुझी आअी ! अिथली मालकीण ! अन् मी तिची आअी ! ”
( अंक १ ला )

पणें घेऊन व त्याच्याकडे क्षणभर पाहून रेखा तो पाकिटांत ठेवून देते)
ठिकाना पन ठिकाना बगितलाय् हं बाबासायबांनी. जोडा पन अक्षी राम-सीतेवानी शोभेल.

**रेखा**– (हसून) अग, बाबासाहेबांनी नाही बघितलं हें ठिकाण.

**सखू**– मंजी?

**शकू**– तुझं तूंच का जमवलं आहेस?

**रेखा**– हो. ते माझ्या कॉलेजांतच आहेत म्हणून सांगितलं नाही का मीं तुम्हांला? तिथं आमची ओळख झाली अन् आता...

**सखू**– पिरीम जडलंय् तुमचं अेकमेकांवर, असंच का न्हाअी? पर बाबासायबास्नी ह्ये ठाव नाय म्हनतांय् तुमी, मंग ...?

**रेखा**– तशी काळजी नको करूं सखू तूं! बाबा मुंबअीला यायचे आहेत हें कळवलं होतं मीं त्यांना. त्याचंच अुत्तर आलंय् त्यांचं. बाबांची भेट घेणार आहेत ते. भेटणार कां? हें परवाच्या तारखेचं पत्र ना? म्हणजे काल भेटलेसुद्धा असतील. बाबांना सारी हकीगत सांगून ते मागणी घालणार आहेत.

**शकू**– पण रेखा, तूं असं परभारें लग्न ठरवल्यानं रागावणार तर नाहीत बाबासाहेब?

**रेखा**– बाबांनी रागावण्याजोगं काय वाअीट आहे त्याच्यांत? अेवढंच, की आमच्यासारखे ते बडे श्रीमंत नाहीत! नसेनात! पैशाच्या श्रीमंतीला घेअून करायचंय् काय?

**शकू**– अग हो! पण हें झालं तुझं मत. तुझ्या बाबांना वाटलं पाहिजे ना तसं!

**रेखा**– हो. म्हणूनच थोडी भीति वाटतेय्. कारण आमचे बाबा आहेत जरासे लहरी!

**सखू**– व्हय, न्हायतर त्या पंडितांच्या पोरीसारकं...

**रेखा**– कोण पंडितांची पोरगी ग ?

**शकू**– अग, ती पंडित वकिलांची प्रभा. तीच म्हणत असेल ही. होय ना ग सखू ?

**सखू**– व्हय, तीच.

**रेखा**– अगबाअी ! कोण प्रभा ? काय झालं मग तिचं ?

**सखू**– त्येंच्या वाड्यांत तो बाबा ऱ्हात व्हता नव्ह का मास्तर ? त्येलाच भाळली. बाला त्यें कळलं तवा किती दंगा, किती आरडा झाला साऱ्या आळीभर ! आन् तुमाला माहीत ऱ्हाय व्हय् ? पर तुमी हायसा कुटं आता हतं म्हना !

**रेखा**– होय का ग शकू ? खरंच का हें सारं ? (शकू मान हालवते ) बरं, पुढं काय झालं ?

**सखू**– काय व्हायचं ? अेक दिस रातचीच गेली त्येच्यासंगं अन् क्येलं लगीन. आता बा अन् ल्येक अेकमेकांचं त्वांड बी बगत नायती बगा !

**रेखा**– वा ! छान झालं की !

**सखू**– अुं: ! हें छान व्हय ? बा अिकता शिरमंत अन् त्येनं कसं चक्कोट घर बगितलं व्हतं पोरीसाठी. पर ही पोरगी पडली ना अशी गुनाची !

**रेखा**– काय केलंन् ग तिनं ? शाबासच म्हटली पाहिजे अुलट तिच्या गुणाची ! समज, अुद्या बाबांना सुरेश पसंत पडले नाहीत अन् त्यांनी आम्हांला नकार दिला तर आम्हांलासुद्धा असंच करावं लागेल अेखादे वेळीं.

**सखू**– काय तरी असं वंगाळ बोलूं नगासा. असला हिऱ्यावानी जावाय नगा म्हनाया बाबासाब काय येडं हायती व्हय ? मग काय आमाला लौकरच पोळी मिळनार बरं का शकूताअी. पर व्हायचं कुटं लगीन ? हतं का म्हमअीला ?

**रेखा**— अग, अशी अुतावीळ काय झालीस? आधी बाबांची अन् त्यांची भेट होअूंद्या अन् मग काय होतंय् तें पाहूं! जमलं तर बाबांच्याबरोबरच येतील ते अिथं.

**सखू**— खरं म्हनतायसा काय? मंग मला नीट तयारी करून ठिवली पायजे. ( जाअूं लागते )

**रेखा**— बरं सखू, शकू आलीय् तेव्हा जरा चहा करून आण पाहूं छानपैकी.

**सखू**— बरं हाय. ( जाते )

**शकू**— अेकूण तूं आपलं लग्न जमवलंस म्हणायचं ? शाबास रेखा! भाग्यवान आहेस हं. अभिनंदन करतें तुझं.

**रेखा**— आभारी आहें तुझी. पण काय ग, आज अिकडेशी वाट चुकलीस ?

**शकू**— ( घुटमळत ) तुझ्याकडेच होतं थोडं काम.

**रेखा**— माझ्याकडे ? कसलं ग ?

**शकू**— अग, किनअी, अ...अ...

**रेखा**— अिश्श! हें काय ग? अडखळलीस कां अशी? सांग ना?

**शकू**— हें बघ, मला तुझं अेक चांगलंसं पातळ अन् ब्लाअूझ हवा आहे. अन् कानांत घालायचे अिअरिंग.

**रेखा**— हात्तेच्या! अेवढंच ना? मग अेक सोडून दोन घेअून जा की! पण काय ग, कसला समारंभ आहे? अेखादं नाटकबिटक बसवतां की काय सुटींत?

**शकू**— नाटक... हो, नाटकच म्हणावं तर काय!

**रेखा**— म्हणजे ?

**शकू**— म्हणजे काय? पाहायला यायचे आहेत मला आज. म्हणून सजवायचंय् सांग!

**रेखा**— शकू, तूंच का बोलते आहेस हें ?

**शकू**— हो, मीच. काय झालं त्यांत ?

**रेखा**— काय झालं ? शाळेंत असतांना अितर मुलींशीं वाद घालणारी अन् वधूपरिक्षेच्या चालीविरुद्ध साऱ्या मुलींनी अेकजात बंड केलं पाहिजे असं म्हणणारी शकू ती तूंच का? कुठं गेला तुझा तो आवेश अन् तुझीं तीं क्रांतिकारक मतं ?

**शकू**— ( खिन्नपणाने हसून ) मतं ...! गेलीं परिस्थितीच्या प्रवाहांत वाहून माझीं मतं.

**रेखा**— म्हणे परिस्थिति ! भारीच बंड झालंय् आताशा या परिस्थितीचं ! जिथं तिथं कसली आलीय् ग परिस्थिति ? स्वतःच्या मनाचा कुमकुवतपणा लपवण्यासाठी परिस्थितीची सबब पुढं करायची, दुसरं काय ?

**शकू**— म्हण बाअी तुला काय म्हणायचंय् तें.

**रेखा**— ( शकूच्या खांद्यावर हात ठेवून ) शकू, रागावूं नको. तुझ्या मनाला लागावं म्हणून का बोललें मी ? पण तूंच सांग. आपल्यासारख्या शिकल्यासवरल्या मुलींनी जर स्वाभिमान विसरून या ओंगळ रूढीला मान तुकवली तर मग सुधारणा व्हायची कशी ? विकायला काढलेल्या अेखाद्या जनावराप्रमाणं जो येअील त्याच्यापुढं आपलं प्रदर्शन करायचं... छी ग बाअी ! मरण पुरवलं त्यापेक्षा !

**शकू**— तुला या प्रकाराची चीड येते अन् मला येत नाही असं का वाटतं तुला ? पहिल्या प्रथम जेव्हा बाबांनी मला दाखवायला न्यायचं ठरवलं तेव्हा तर मी ढसढसून रडलें तासभर. आअीनं किती समजूत घातली ! बाबा तर म्हणाले, 'तुला नको असेल तर त्यांना निरोप पाठवतों अन् यापुढं स्थळं पाहण्याचा नाद सोडून देतों ' म्हणून. पण मग मींच विचार केला अन् त्या मानहानीला निमूटपणानं तयार झालें. अन् आता तर सरावानं कांहीच वाटत नाही त्याचं !

**रेखा**– मी दुबळेपणा म्हणतें तो हाच बरं, शकू. तुझ्या बाबांच्यासारखे समजूतदार वडील तरी कुठं असतात साऱ्यांना ? रागावून, संतापून हुकुमत गाजविणारेच फार. ' मुकाट्यानं मी सांगतों तसं अैक; नाहीतर घरांतून चालती हो, ' असं म्हणाले असते तर त्यांच्याशीं युद्धच पुकारावं लागलं असतं. पण ते खरोखरच विवेकी अन् मायाळू म्हणून ' निरोप पाठवतों ' असं म्हणाले. पण तूं कसली ! आपण होअून मान गोवायला तयार झालीस. कां ग नाही सांगितलंस त्यांना निरोप पाठवायला ? ( सखू चहा घेअून येते )

**सखू**– कुनाला निरोप पाटवायचा हाय व्हय ? सांगा, जाअून येतें आत्ता.

**रेखा**– अग, तुझ्याकडे हें काम नाही. आमचं आपलं निराळंच बोलणं चाललं आहे. तूं जा आपल्या कामाला.

**सखू**– आता काय बोलन्याला तोटा ! ( जाते )

**शकू**– रेखा, आमच्यासारख्या मध्यम स्थितींतल्या मुलींचा विचार तूं केला नाहीस, म्हणून बोलते आहेस असं. तुझी गोष्ट निराळी आहे. बाबासाहेबांची तूं अेकुलती अेक मुलगी. तुझे वडील श्रीमंत अन् सुधारक. नेहमी खेळाच्या अन् पार्टीच्या निमित्तानं तुला पुरुषांत मिसळायची सवय. कॉलेजच्या शिक्षणासाठी तूं अिथून मावशीकडे गेलीस. तिथं तुला अिथल्याहून मोकळीक मिळाली. तुझ्या श्रीमंतीमुळं, रूपामुळं मुलंहि तुझ्या पुढंपुढं करीत असतील. अशांतच सुरेशची अन् तुझी ओळख झाली अन् तुमचं प्रेम जमलं. आता तुम्ही लग्नाच्या विचारांत आहांत. अशी संधि प्रत्येकीला मिळेल का ?

**रेखा**– कां बरं नाही मिळायची ? त्या प्रभीनंच बघ की. मिळवलान् की नाही आपल्या पसंतीचा नवरा ?

**शकू**– हें बघ रेखा, प्रभाचं अुदाहरण अपवाद म्हणून आहे; पण बहुतेक स्थिति काय असते, हें तूं पाहतेसच. लग्न होअीपर्यंत

शिकवायचं, अन् शिकवलं तर लग्नाचा प्रश्न सोपा होओील अशा दुहेरी हिशेबानं आमचे पालक आम्हांला शाळेंत घालतात. शाळा अन् घर हेंच आमचं जग. बरोबरीच्या मुलांत मिसळायला संधि आहे का या ठिकाणीं ? अगदी जवळच्या नातेवाअिकाखेरीज अितरां-कडे पाहायचीसुद्धा आम्हांला चोरी ! अन् शाळांतून तर काय बहुतेक स्त्रीराज्य ! मास्तर असलेच तर म्हातारे, निदान विवाहित. तशांतच खरे-खोटे प्रवाद निर्माण होत असतात. तेव्हा अनुरूप अशा मुलां-मुलींच्या गाठी पडायच्या कुठं, त्यांचीं मनं मिळायचीं कशीं अन् लग्नं व्हायचीं कशीं ? आता माझंच बघ ना. यंदा कशीबशी मॅट्रिक झालें मी; पण पुढं आता घरींच राहावं लागणार आहे. मग बाबांच्या ओढघस्तीच्या संसारांत अेक लोढणं होअून बसण्यापेक्षा तें जो पत्क-रील त्याच्या गळ्यांत बांधलेलं बरं नाही का ?

**रेखा**– शकू, खरं आहे तुझं म्हणणं. या दृष्टीनं मीं कधी विचारच केला नाही. बाकी कॉलेजमधे तरी काय हीच स्थिति असते मुलांमुलींची. तीं अेकत्र येतात; पण अशा विचित्र मनानं, की त्यांना अेकमेकांबद्दल विश्वास अन् आपुलकी अुत्पन्न होतच नाही. अेखादी असली धीट अन् तिला संधि मिळालीच तर ... पण अशीं अुदाहरणं क्वचित्. (सखू प्रवेश करून चहाचे रिकामे पेले घेअून जाते)

**शकू**– अग, म्हणूनच तर बी. अे. अन् अेम्. अे. झालेल्या मुलींचीं लग्नंदेखील त्यांचे आअीबाप जमवितात. अन् तींसुद्धा लौकर जमलीं तर ठीक; नाहीतर जन्मभर कुमारी राहायचं समाज-सेवा करीत. आपल्या अवंतीबाअी आहेत ना, तसं.

**रेखा**– खरंच बाअी ! असे नमुने पाहिले म्हणजे मात्र वाटतं, की जर करायचंच असेल लग्न तर वेळेवर करावं, नाहीतर मग पश्चात्तापाची अन् झुरणीस लागण्याची पाळी यायची ! बरं पण चल, तुला पातळ हवं आहे ना ? तें काढून देतें. ( दोघी जातात. अवंतीबाअी व यमुना प्रवेश करतात )

**अवंती**– रेखा, अग रेखा! कुठं दिसत नाही ही? रेखा...

**रेखा**– ( आंतून ) कोण आहे? थांबा हो, आलें.

**अवंती**– ये हो सावकाश. आम्ही बसतों तोंपर्यंत. ( यमूसह खोलींत अिकडेतिकडे पाहात ) आमची ही रेखा म्हणजे मोठी टापटिपीची अन् हुषार मुलगी आहे हो यमू. पाहशीलच आता.

**यमू**– बाअी, हा फोटो कुणाचा हो?

**अवंती**– अग, रेखाच्या आअीचा. फार चांगली होती हो स्वभावानं. माझी अन् तिची तर फार गट्टी होती.

**यमू**– म्हणजे रेखाबाअींना आअी नाही होय?

**अवंती**– हो ना. झालीं दोन वर्षं बिचारीला जाअून.

**यमू**– मग फिरून लग्न वगैरे केलं नाही वाटतं तिच्या वडिलांनी?

**अवंती**– नाही केलं. मधे कांही खटपट चालू असल्याचं कानांवर आलं होतं; पण तें तितकंच! अन् विचारणार तरी कोण? ते आहेत जरासे हेकेखोर अन् लहरी. म्हणजे अेरवी तसे चांगले आहेत परोपकाराला अन् दानधर्माला. आमच्या अनाथाश्रमाला त्यांनी पांच हजारांची देणगी दिली आहे अन् सेवामंदिरांत तर त्यांनी ट्रस्टच केला आहे चाळीस हजारांचा. तुला स्कॉलर्शिप् मिळणार ती त्यांतूनच.

**यमू**– अस्सं होय. ( शकू व रेखा प्रवेश करतात )

**रेखा**– काय बाअी, फार वेळ बसावं लागलं का?

**अवंती**– नाही ग. वेळ कशाचा? वा! शकू, तूं अिकडे कुणीकडे आली होतीस?

**शकू**– आलें होतें सहज रेखाताअीकडे काम होतं म्हणून. बरं झालं. अनायासंच भेट झाली तुमची. बरं रेखा, जातें हं मी. ( जाते. पण निघायच्या गडबडींत अिअरिंगची डबी टेबलावर राहाते.)

**रेखा**— बाअी, मी अिथं आल्यावर तुमच्याकडे येअून गेलें अेकदा. गावाला गेल्याचं कळलं तुम्ही. अन् या कोण पाहुण्या ?

**अवंती**— ही होय ? रामापुराहून आणली आहे मीं येतांना परवा सेवा-मंदिरांत शिकायला. हिचं नांव यमू. अन् ही रेखा बरं का यमू. ( दोघी अेकमेकींस नमस्कार करतात. )

**रेखा**— रामापुराकडे अनाथाश्रमासाठी फंड गोळा करायला गेलां होतांत की काय ?

**अवंती**— अग, काम काय अेकच असतं होय ! फंड तर जमवलाच; शिवाय आमच्या सेवा-मंदिरांतल्या अेका बाअीची कांही भानगड होती. तिच्या दिराचीं निनांवीं पत्रं अन् धमक्या येत होत्या सारख्या. तिथं जाअून अन् त्याची चोकशी करून ती सारी भानगड मिटवून आलें. व्यायाम मंडळाला मुंबअीच्या अेका शेठजींनी देणगी दिली होती, ती वांध्यांत पडली; तेव्हा त्यांना भेटून खुलासा करून घेतला. अशीं अेक ना दोन, हज्जार कामं !

**रेखा**— बाअी, धन्य आहे हो तुमची ! अुरकतां तरी कशीं हो हीं सगळीं कामं तुम्ही ? आमचा तर बाअी अैकूनच जीव दडपतो ! ( यमूस अुद्देशून ) नाही का हो ?

**अवंती**— ( हसून ) अग, त्यांत काय आहे ? त्यांतच पडलं म्हणजे सारं करतां येतं.

**रेखा**— असंच कांही म्हणूं नका बाअी ! कळकळ अन् कष्टाळू-पणा यांखेरीज होत नाहीत या गोष्टी. नाहीतर सार्वजनिक कार्यकर्त्या म्हणून मिरवणाऱ्या पुष्कळ बायकांचे नमुने पाहतोंच की आपण.

**यमू**— मी ज्यांच्या घरीं होतें त्यांचंच अुदाहरण पाहा की तुम्ही बाअी. दोनचार संस्थांच्या अध्यक्ष अन् चिटणीस— पण कार्य पाहाल तर शून्य ! वार्षिक रिपोर्ट मात्र पाहून घ्यावा ! अन् कुणी परगावचे पाहुणे वगैरे आले तर मात्र वारं भरतं यांच्या अंगांत !

ते कार्यक्रम काय, त्या लांबलांब गप्पा काय... अेखाद्याला वाटावं काय जोरांत चाललंय् संस्थेचं काम !

**अवंती**– जाअूंदे यमू. लोकांचीं अुदाहरणं करायचीं आहेत काय आपल्याला ! आपल्या हातून होअील तें करावं. अन् तसं म्हणशील, तर त्यांनी तुला चारसहा महिने आश्रय दिला म्हणूनच हे दिवस निभावले ना तुझे ?

**यमू**– तें नका सांगूं हो बाअी. त्यांचं हो काय वाअीट झालं ? नुसती पोटावारी स्वयंपाकीण मिळाली होती त्यांना. ' दुपारीं शिवण-क्लासला जातें, त्याची फक्त दीड रुपया फी तुम्ही द्या ' असं म्हटलं तर तेंसुद्धा सतरा सबबी सांगून अुडवून लावलं ! अन् म्हणे आश्रय दिला ! म्हणून तर मला त्यांच्या समाजकार्याच्या बातांची चीड आलीय्.

**अवंती**– जाअूंदे ग. आता माझ्याकडे आलीस ना तूं ? किती हवं तितकं शीक आता. बरं का रेखा, या यमूची हकीकत मोठी नमुनेदार आहे बघ. ही अेका गरीब शाळामास्तराची मुलगी. बापानं आपल्या अैपतीप्रमाणं शिकवलीसवरली अन् घराण्याच्या मोठेपणाला फसून अेका अुनाड व्यसनी माणसाच्या पदरांत बांधली. पुढं घराची वाताहात झाली ! हिचा नवरा मारामाऱ्या, लोकांच्या बायकांच्या वाटेला जाणं, असले धंदे करून अखेर घरांतून निघून गेला अन् हिच्या कपाळीं वनवास आला ! तरुण मुलगी. घरांत कुणी ठेवून घेअीना. अखेर आता सांगितल्या ठिकाणीं ती राहिली असतां तिथं माझी गाठ पडली. बुद्धीनं हुशार आहे. शिकलीसवरली तर नांव काढील असं दिसलं म्हणून मी येतांना तिला घेअून आलें.

**रेखा**– (यमूने मान खाली घातलेली असते तिला) तुम्ही अुगीच वाअीट कशाला वाटून घेतां यमूताअी ? आता यापुढं काळजी करूं नका. बाअींचा आश्रय म्हणजे परीस आहे.

**यमू**– ( अुठून ) बाअी, तुम्ही थांबणार आहांत ? मी होअूं पुढं ? सापडेल ना वाट मला ?

**रेखा**– कां हो ? थांबा की थोडा वेळ.

**अवंती**– ( यमूच्या गोऱ्यामोऱ्या चेहऱ्याकडे पाहून ) नको ग ! जाअूं द्या तिला. सकाळपासून दोनतीन घरीं माझ्याबरोबर आली आहे. कंटाळली असेल आता. ( यमू जाते. तिच्याकडे पाहून ) वाअीट वाटतं बिचारीला. जिथं जावं तिथं ही कर्मकहाणी आहेच की. आता घरीं जाअून रडेल पोटभर. म्हणूनच ' जा ' म्हटलं तिला.

**रेखा**– मोठी अभिमानी दिसते बरं का.

**अवंती**– होय ना ! अन् चाणाक्षहि तशीच हो. शिक्षण मराठीच झालंय्; पण बोलणं अन् विचार पाहिलेस ना ?

**रेखा**– दुर्दैवी बिचारी ! पण आता तुमच्याजवळ संपलं तिचं नष्टचर्य.

**अवंती**– संपतं आहे कसलं रेखा...

**रेखा**– कां बरं ? शिकेलसवरेल तुमच्या हाताखाली अन् चांगली कार्यकर्त्री होअील.

**अवंती**– तेवढ्यानं सारं संपलं का रेखा ? तरुण मुलगी अन् तिच्या वैवाहिक आयुष्याचा खेळखंडोबा झालेला... !

**रेखा**– अं... ! त्याला आता कुणीं काय करावं ? संसार नशिबीं नाही असं समजून समाजकार्यांत आनंद मानावा झालं.

**अवंती**– संसारसुखाचा मोह टाळणं कांही तितकं सोपं नाही, रेखा.

**रेखा**– कां बरं ? तुमच्यासारखीं अुदाहरणं पुढं असतांना... ( जीभ चावते )

**अवंती**– माझं राहूं दे ग, पण सामान्यपणानं...

**रेखा**– खरंच, किती निरुपयोगी झाली आहे आपली ही विवाहसंस्था ! ही सुधारायला काय केलं पाहिजे बाओी?

**अवंती**– पहिली सुधारणा म्हणजे लग्नं मुलांमुलींच्या पसंतीनं झालीं पाहिजेत.

**रेखा**– खरंच बाओी. बरी आठवण झाली. मघाशी शकू कशाला आली होती माहीत आहे तुम्हाला ?

**अवंती**– मला ग काय माहीत ?

**रेखा**– तिला दाखवायला न्यायची आहे कुठंशी, म्हणून कपडे मागायला आली होती. मीं तिला बोललें, की ' तूं कां याला तयार झालीस ? ' म्हणून. तर तिनं मध्यम स्थितीतल्या जीवनाचं असं वर्णन केलं, की अशा मुलांमुलींना अेकत्र यायला त्यांत वावच नाही कुठं !

**अवंती**– खरी आहे तिची अडचण. माझ्या मनांतसुद्धा पुष्कळ दिवस यावर विचार चालू आहे. अन् अेक कल्पना पण आली आहे माझ्या मनांत.

**रेखा**– खरंच ? कोणती ?

**अवंती**– हें बघ. अेक ' परिचय मंडळ ' स्थापन करायचं. तरुण लग्नेच्छु मुलांमुलींचा अेकमेकांशीं परिचय होओील अशी योजना त्यांत करायची. वादविवाद, सहली, खेळ असे मनोरंजक कार्यक्रम ठेवायचे अन् जबाबदार अशा प्रौढ मंडळींनी त्यांवर देखरेख ठेवायची.

**रेखा**– पण बाओी, आपल्या अुपवर मुली त्यांत पाठवायला पालक तयार होतील का?

**अवंती**– अग, न व्हायला काय झालं ? पहिल्याप्रथम विरोध करतील. टवाळीहि होओील पुष्कळशी. पण असं कोणत्या नव्या कल्पनेचं होत नाही ? हळूहळू त्याची अुपयुक्तता पटूं लागली अन् विश्वास आला संस्थेबद्दल की आपोआप पाठवतील. बरं, पण येअूं आता मी ? ( अुठूं लागते )

**शकू**– ( पुन्हा प्रवेश करून ) रेखाताअी, अिअररिंगची डबी मी अिथंच विसरून गेलें, म्हणून आलें आहें पुन्हा. ( डबी घेते )

**रेखा**– अस्सं होय. बरंच झालं म्हणायचं मग. बाअी, ही शकू तुमच्या मंडळाची पहिली सभासद होअील बरं का.

**शकू**– कसलं ग मंडळ ?

**रेखा**– तें बाअीच सांगतील तुला वाटेनं जातांजातां. ( शकू व बाअी जातात. रेखा आरशांत पाहते. बाहेर ' रेखा राजवाडे, रेखा राजवाडे आहेत का ? ' असे शब्द अैकूं येतात ) अगबाअी ! कोण ? तारवाला दिसतोय् ! ( सखू लखोटा व तारेचा सहीचा फॉर्म घेअून येते )

**सखू** – तार आलीया बगा तुमची. ( रेखा सही करून लखोटा फोडते, तोंवर फॉर्म परत करून सखू येते ) कुनाची तार हाय ताअी ?

**रेखा**– ( तार वाचते ) ' कमिंग बाय नून ट्रेन. नॉट अलोन. वेट फॉर अे ग्रेट सर्प्राअिज. ' ( आनंदानें ) अगबाअी ! सुरेश येणार वाटतं बाबांच्याबरोबर ?

**सखू**– काय ? बाबासाब येनार ? अन् तुमचं सुरेश बी येनार त्येंच्यासंगं ?

**रेखा**– बहुतेक तेच. बहुतेक कां, खात्रीनंच म्हण की. नाहीतर सर्प्राअिज कुणाच्या येण्याचं वाटायचं आहे ? बाबा तरी असले आहेत ! नांव लिहिलं असतं तर ? तर मग सर्प्राअिज कसं झालं असतं ? अन् तार केली आहे जवळच्या जंक्शनवरून. मोठ्या माणसांना-सुद्धा चेष्टा करायची कधीकधी लहर येते ! चल सखू, आपल्याला तयारीला लागलं पाहिजे. वेळ राहिला आहे थोडा. आटप. चहाची तयारी टेवायला सांग काकूंना अन् आंघोळीचं पाणी तापवून टेव.

**सखू**– पानी मस्त अुकळून चाललंया, पन तुमी आंगुळीला श्रुटाल तवा.

**रेखा**– माझी आंघोळ राहूं द्या ग. पाहुण्यांची तयारी मात्र नीट ठेव हं. (सखू जाऊं लागते) अन् हें बघ सखू, बागेंतलीं चांगलीं ताजीं फुलं आणून दे पाहूं मला या फुलदाणींत ठेवायला.

**सखू**– सकाळींच तर आनलींयात् नव्हं का?

**रेखा**– पण तीं सुकून गेलीं आहेत ना सगळीं! अन् तुला काय करायचं आहे? आण म्हटलं, आणावीं.

**सखू**– बरं य्! जातें बापडी! (सखू पुन्हा जाऊं लागते)

**रेखा**– अन् हें बघ, खंडूला सायकलवरून पाठव दुकानांत. चांगलीं बिस्किटं अन् केक्स आण म्हणावं.

**सखू**– आं! अन् काल आनलेला पुडा अजून फोडला बी नाय की बिस्कुटांचा.

**रेखा**– जा ग बाअी, सांगितलं तें कर मुकाट्यानं. (सखूला आणखी अेकदा थोपवून) अन् हें बघ; त्याला म्हणावं मंडअींतून थोडीं मोसंबीं अन् आंबेहि घेअून ये चांगल्यापैकी. आणखी अेक विसरलेंच. काकूंना म्हणावं, स्वयंपाकांत तिखट थोडं कमी घाला. अन् वांगीं असलीं तर वांगींभात करायला सांग. वांगींभात फार आवडतो त्यांना. जा ना! बघत काय अुभी राहिलीस?

**सखू**– म्हनलं आनिक काय राह्यलं असलं तर अुगीच...

**रेखा**– बरं जा जा! चेष्टा करूं नको. (सखू जाते. रेखा अेक गाणें गुणगुणत खोलीची जरा मांडणी करूं लागते) किती आनंद झालाय् मला आज! साऱ्या गोष्टी कशा मनासारख्या जुळून आल्या आहेत. (फोटोजवळ जाअून) आज आअी असती तर तिला किती आनंद झाला असता! किती कोडकौतुक केलं असतंन् तिनं सुरेशचं! पण आअी नाही तरी बाबांनी काय कमी केलंय् मला म्हणा. खरंच, किती भाग्यवान आहें मी. (आरशाजवळ जाअून केस चापूनचोपून बसवीत) अिश्श बाअी! वेणीसुद्धा घातली नाही मीं नीट. साडी बदलूं

का? पण नको. वेळ नाही आता. बाबांना जरा आधी कळवायला काय झालं होतं? सारी तारांबळ करून टाकली आहे माझी. (खोलींतील सामानाची व्यवस्था लावण्याची धांदल करते) ही फुलदाणी अिथं ठेवली तर बरी दिसेल की त्या टेबलावर ठेवावी? अन् हा फोटो असा समोर टेवावा, नाही? (सखू फुलें आणून देते)

**सखू**— ताअी, म्या तुकडा ववाळून टाकनार बरं का त्येंच्या-वरनं. हसूंबिसूं नका मला.

**रेखा**— (हसून) बरं बरं! जा कर काय हवं तें तुला. (फुलें रचते. पडद्यांत थोडी गडबड व बाबासाहेबांचा आवाज— 'सखू, अग हें सामान आंत घेअून जा') अगबाअी. हें काय? आले वाटतं बाबा? (धावत दुसऱ्या विंगपाशी जाते. सखू डोक्यावर अेक जुनी गंजलेली ट्रंक व हातांत टिनचा डबा घेअून येते. तिच्या मागोमाग अेक खेड-वळ नववधू हिरवें लुगडें नेसलेली व काखेंत अेक बोचकें घेतलेली जहांबाज बाअी येते. त्यांच्याकडे विस्मयाने पाहात रेखा अेकअेक पाअूल मागे सरकते!)

**रेखा**— (भयचकित) कोण आपण?

**म्हाळसाबाअी**— (बोचकें दाणकन् आपटून) कोण? सांगतें. रेखाच ना तूं? ही...ही... तुझी आअी. अिथली मालकीण! अन् मी तिची आअी. (कमरेवर हात ठेवून पवित्र्यांत अुभी राहाते. सखू सामान टाकून देते.)

## (पडदा)



# ८

## प्रवेश १ ला

( रेखाताअीची पहिल्या अंकांतील खोली. सखू खोलीची साफसफाअी करीत आहे. )

**अवंती**– काय ग सखू, मालकीणबाअी आहेत का तुझ्या घरांत ?

**सखू**– मालकीन ? कुनाची मालकीन ? ( फोटोकडे बोट दाखवून ) माजी मालकीन ही पगा. ग्येली बिचारी सरगीं ? सोन्याची झाली. आज अिकती वर्स या घरांत काढलीं म्या. क्वा ग्येली त्यें कळ्ळं बी नाय ! पर आता अेकेक दिस म्हंजी कसा जिवावर निगतुया ! माजी मालकीन व्हती तवा येवळागत व्हतं हयें घर. पर आता झालीय् मसनवटी ! आन् भुतं नाचाया लागलींत ततं !

**अवंती**– अग, बाबासाहेबांच्या नव्या पत्नी आहेत ना घरांत ? त्यांनी बोलावणं पाठवलं म्हणून आलें आहें मी

**सखू**– तुमी रग्गड आलांया, पर त्या बयाचा पाय असाय नग का घरीं ? कुट्टन बुध झाली मालकाला हया म्हातारपनांत लगीन करायची ! आन् करायचीच व्हती तर काय कुळवान बायकू मिळत न्हवती ? पन हये कुटलं आनलंय् कमअस्सल ! बाचा तर पत्याच

न्हाय ! आन् आओी म्हनं भाकरी भाजीत व्हती खानावळींत ! आता ग्येली असंल त्या रंगरावाबरोबर भटकायला !

**अवंती**– रंगराव ? हा रंगराव ग कोण ?

**सखू**– हाय मेला त्यांचाच कोनतरी. अेकांदा मवाली बरा, असली त्याची सुरत ! लावन्या काय म्हनतुया, पान खाअून थुकतुया काय जतं ततं. परवा आपला मला बगुनच डोळा मिचकावूं लागला मेला ! पर जवा का पायांतलं खेट्टर म्या हातांत घेतलं, तवा गेला त्वांड घेअून !

**अवंती**– पण अिथं आलाय् कशासाठी तो ?

**सखू**– कशाला ? यवडं बी समजंना व्हय बाअी तुमाला ? म्हाताऱ्या दादल्यानं तरनी बायको आनली घरांत म्हंजी तिचा सारा गोतावळा जमायचाच की भुतावानी. आन् हथं बगा... ( आंतून– ' सखू, अे सखू ! ' अशी म्हाळसाबाअीची ललकारी ) हं, हथं आलं बगा अेक भूत. भूत कसलं, डाकीन हाय ही डाकीन !

**म्हाळसा**– ( प्रवेश करून ) सखू, कामधाम टाकून अिथं चकाट्या पिटीत बसलीस होय ग ! या घरांत मुलीपासून मोलकरणीपर्यंत अेकाला म्हणून वळण नाही. सारा बेशिस्त कारभार. येणारजाणार तेहि तसेच. मीं मुळी जावयांना सांगून भय्याच ठेवलाय् दारावर. हो ! मेलीं कुणीं अलबतीं गलबतीं माणसं शिरायला नकोत घरांत !

**सखू**– जरा आदीच ही बुध झाली असती मालकाला तर लअी ब्येस झालं असतं. पर आता काय ! बैल गेला नि झोपा क्येला.

**म्हाळसा**– अस्सं ! म्हणजे मी या घरांत घुसलें असं म्हणायचं आहे होय तुला ? पण हें बघ, कसंहि असलं तरी हें माझं राज्य आहे आता.

**सखू**– रावनासारक्यांचीं राज्यं बी गेलीं अुलथून येळ आल्याबरुबर, तनं तुमच्याआमच्यासारक्याची काय कथा सांगतांय् !



सखू- " कसा राजबिंडा दिसतूया अगदी ! "

( अंक १ ला )

**म्हाळसा**– कां ग ! जीभ फारशी सैल सोडली आहेस ! मस्ती आली वाटतं ?

**सखू**– ( आवाज चढवून ) माजी मस्ती काडूं नका मामी, सांगूनशेनी ठिवतें. माजाया म्या काय कुना जावयाचं आन खातीया का काय ? मनगाट रावबून भरतीया प्वाट.

**म्हाळसा**– बरं बरं ! जास्त नको बोलूं. हो चालती आपल्या कामाला. अन् ' मला मामी म्हणूं नको ' म्हणून किती वेळा सांगितलं तुला ? एवढे जावअीसुद्धा मला ' आअीसाहेब ' म्हणतात, तिथं तूं कोण मेली ?

**सखू**– पर ' आअीसायब ' म्हनलं तर ' ओ ' द्यायची तरी तुमाला सूद कुठं -हातीया ? आजपावतर खानावळींत ' मामी, मामी ' म्हनून घ्यायची सव, तवा...

**म्हाळसा**– आधी घरांत चालूं लाग बघूं तूं. अन् बाअीसाहेब आल्या असल्या तर म्हणावं बोलावलं आहे मीं जरा. ( सखू जाते ) हें बघा बाअी, तुम्हाला अशासाठी बोलावणं पाठवलं मीं, की आमची चद्राताअी झाली आहे आता थोरामोठ्याची बायको. तेव्हा त्यांच्या योग्यतेला साजेल असं तिला वागायला पाहिजे. तशी ती मोठी हुषार आहे म्हणा; पण लहानपणीं अडचणीमुळं शिकणं झालं नाही फारसं म्हणून तुम्हाला मींच बोलावणं पाठवलं. अेखादी चांगली मास्तरीण तुमच्या माहितीनं पाहून द्या, नाहीतर तुम्हीच शिकवा.

**अवंती**– पण अगोदर त्या शिकल्या आहेत किती अन् पुढं काय शिकायचं आहे हें मला आधी समजलं पाहिजे ना.

**म्हाळसा**– आधीचं घेअून करायचं आहे काय तुम्हाला ? नसत्या पंचायत्या करण्याची भारीच बाअी खोड अेकेका माणसाला.

**अवंती**– हें पाहा, मला काय करायच्या आहेत नसत्या पंचायती ! तुम्हीं बोलावणं पाठवलं म्हणून आलें आहें मी. अन् आता

न.वा. ३

मुलीला शिकवायचं म्हणतां तर तिची पहिली तयारी किती आहे हें नको का पाहायला ? नसलं नीट सांगायचं तर मी आपली जातें.

**म्हाळसा**– अहो, अशा रागावूं नका मास्तरीणबाअी. पण हें पाहा, तिला शिकायचं तें कशासाठी? तर चार लोकांत तिचं चांगलं वजन पडावं म्हणून. नाहीतर शिकून तिला काय मास्तरीण का व्हायचं आहे तुमच्यासारखं ? सांगा. म्हणून म्हणतें तिला असं शिकवा, की चार माणसांत यस्-फ्यस् करतां येअील, सभेंत घडाघडा बोलतां येअील. अिंग्रजी, मराठी काय हवं तें शिकवा; पण मड्डम बनली पाहिजे अगदी पोरगी. थांबा हं. मीच बघून येतें काय करते आहे ती. ( जाते )

**सखू**– ( प्रवेश करून अिकडे तिकडे पाहात ) गेली वाटतं बया ! बरं झालं बाअी ! दिसांतनं धा येळ्यां मनांत येतंय्, की हातांतलं काम तसंच टाकूनशेनी निगुन जावं आन् पुना त्वांड बी बगूं नये या घराचं. पन् माज्या रेकाताअीसाटी जीव गुंतून राह्यलाय् माजा. तिच्या तोंडाकडे नजर ग्येली की अक्षी भडभडून येतंया. कशी अेकांद्या केळीच्या गाब्यावानी रसरसीत प्वार, पन सुकून गेलीया निसती या घरांतल्या कहारानं ! बाअी, तुमी आलां, बरं झालं बगा ! न्हाअीतर मी येनारच हुतें तुमाला सांगाया. बाअी, काय बी करा, पर ताअीची यवढी मोकळीक करा या बयाच्या तावडींतनं झट-पट. नाय तर बरी गत नाय तिची.

**अवंती**– काय ग, अलीकडे कांही विशेष झालंय् वाटतं ?

**सखू**– अवं, काय सांगायचं बाअी ? ताअींचं लगीन त्या मेल्या रंगरावाशीं करायचा ब्येत चालवलाय् बयानं.

**अवंती**– काय म्हणतेस ? रंगरावाशीं ? अन् रेखेचं लग्न ?

**सखू**– व्हय बाअी ! काय सांगूं तुमाला ? अवं, ताअीच्या खेटराची तरी सर हाय का त्या मेल्याला ! पन त्येची बगा काय

मिजास चाललीया घरांत ! कपडं काय, खानं काय, लूट-लूट चाललीया बगा निस्ती.

**अवंती**-- अग,पण बाबासाहेब कसं हें सारं चालूं देतात ?

**सखू**- बाबासाब ! बाअी, बाबासायबांचा सबाव तुमास्नी म्हाअीत न्हाअी व्हय ? सरळ भाबडं मानुस त्ये. जसं वळवावं तसं वळतंय्. तीच तर आटकल गावली बगा त्या बयाला. साऱ्याबद्दल काय न्हाअी त्ये सांगून सारा कारबार घ्येतलाया बयानं आपल्या हातांत. आअीसायबाबिगार कुनाचा येक सबुद बी अैकाया तयार न्हैत त्ये. मंग काय व, संमदं मोकळं रानच गावलं की या बयाला.

**अवंती**- भयंकरच आहे म्हणायची ही बाअी !

**सखू**- अव,भयांकार मंजी लअी भयांकार ! आदीच त्यो रंग-राव तसला हलकट अन् त्यांत या बयाची फूस ! जातां-येतां अुगाच लगाट करतुया ताअीसंगं. ती रागावती, शाप देती, तडफडती आंतल्या आंत, अन् त्यें बगुन ही थेरडी बी हसतीया प्वाट धरधरून ! असा राग आनतीया बया, की सटवीच्या झिंज्या धरून आपटावी चांगली ! बाअी, खरं सांगतें, तळपट तळपट होअील बगा बयाचं !

**म्हाळसा**- (प्रवेश करून) सखू, आलीस का फिरून अिथं ? वाटच बघत होतीस वाटतं मी जाण्याची ? अन् कानगोष्टी कसल्या ग करीत होतीस यांच्याशीं ? मेल्या या मोलकरणींना घरांतल्या गोष्टी बाहेर सांगण्याची खोडच ! अन् तुम्ही तरी मान्यतरीणबाअी, या बाअीवा लघळपणा चालू कसा दिलांत ? बोलूनचालून ही मोल-करीण. पायांतली वहाण पायांतच ठेवली पाहिजे माणसानं. तिला डोक्यावर घेतली की...

**सखू**- घराचा ख्येळखंडूबा झालाच !

**म्हाळसा**- चूप सखू ! बोलूं नकोस अेक अक्षर ! चालती हो अिथून ! रंगराव आंघोळीला अुठत असतील तर त्यांचं पाणी काढ अन् कपडे ठेव, जा.

**सखू**– ह्ये बगा मामी, दुसरीं वाटेल तीं धा कामं सांगा, पर ह्ये काम मी न्हाअी करनार.

**म्हाळसा**– कां बरं ?

**सखू**– माजी मर्जी.

**म्हाळसा**–म्हणे मर्जी ! तुझ्या मर्जीला अिथं विचारतो कोण ? राजाची राणीच पडलीस की नाही ! पैसे मोजतेंय् तुला. सांगूं तें काम निमूटपणानं केलंच पाहिजे तुला.

**सखू**– त्ये न्हाअूंद्या मामी. मोलकरीन झाली तरी वाटल त्ये काम करूं व्हय मी ?

**म्हाळसा**– वाटेल तो म्हणजे रंगरावाला कोण ग समजलीस तूं ? जावअी व्हायचा आहे तो आमचा, समजलीस ? बरं का बाअी, तुम्हाला सांगायचं राहिलंच. रंगरावला रेखा द्यायचं ठरवलं आहे आम्हीं. अहो, म्हणजे किती धूर्तपणाचा बेत आहे माझा. जावअी तर खूष झाले माझा हा बेत अैकून ! अहो, म्हणजे असं बघा, घरांतल्या घरांत हें लग्न जुळवल्यामुळं हुंडा द्यायला नको अन् शिवाय अेकुलती अेक लेक घरांतच राहिली. रंगराव तसा फार चांगला आहे हो. बायकोला अशी सुखांत ठेवील म्हणतां !

**अवंती**– पण रेखाला ही गोष्ट पसंत आहे का ?

**म्हाळसा**–अहो, तिची कसली आली आहे पसंती ? लग्नाच्या कामांत मुलींना का कुठं विचारायचं असतं ? आता माझी चंद्रा मीं अिथं दिली...कुठं विचारलं होतं तिला ? मग आता तिचं काय वाअीट झालंय् ?

**अवंती**– तुमच्या मुलीची गोष्ट वेगळी अन् रेखेची वेगळी ! ती शिकलीसवरली आहे. स्वतःचं बरंवाअीट तिला कळतंय्.

**म्हाळसा**– तें मात्र सांगूं नका हं. अहो, या मुली किती शिकल्या तरी अक्कल नितकीच ! तसं नसतं तर कोण मेला सुरेश की

कोणसा, त्याच्या नादीं कां लागली असती ही? पण जेव्हा का त्यानं दिला गोता तेव्हा बसली रडत. अहो, बरं तर बरं. फारसा बोभाटा झाला नाही या प्रकाराचा! नाहीतर गावांत तोंड काढायला जागा नसती राहिली!

**अवंती**– पण कांही झालं तरी रेखेला विचारल्याखेरीज या गोष्टी ठरवूं नयेत असं मला वाटतं. तिची पसंती आल्याशिवाय...

**म्हाळसा**– अहो तिची तरी पसंती नसायला काय झालंय्? तरुण मुलींनी बोलून दाखवलं नाही तरी मनांतून... (रेखा पडद्यांत– 'मेल्या चांडाळा! सोड माझा हात!')

**सखू**– (दचकून) ताओीच या! (लगबगीनें निघून जाते. अवंतीबाओी डोकावून पाहूं लागतात)

**म्हाळसा**– (अवंतीबाओीच्या दंडाला धरून बसवीत) बसा हो. पोरांची चेष्टामस्करी असेल ही. त्यांत आपण मोठ्यांनी कसलं लक्ष घालायचं? आमच्या रंगरावाचा स्वभाव आहे थोडासा थट्टेखोर. केलीन् असेल कांही थट्टा!

**रेखा**– (संतापून प्रवेश करते) हलकट! नीच! तुला काय वाटलं की मी अशी अडचणींत आहें म्हणून तुझा वाटेल तो किळसवाणा प्रकार सहन करून घेओीन म्हणून? पुन्हा तर वाटेला जाओून पाहा, म्हणजे...

**म्हाळसा**– अग, पण रेखा, झालं तरी काय असं? केली असेल रंगरावानं कांही चेष्टा, म्हणून असं रागवायला नको कांही पोरी.

**रेखा**– माझी चेष्टा करण्याचं कारण नाही त्याला. वाटेंत अडवून मेला हात धरतोय् हलकट!

**म्हाळसा**– अग, मग त्यांत वाओीट काय आहे हेंच कळत नाही मला! तूं तर शिकलेली मुलगी! अन् मावशीच्या घरीं राहून

सुधारलेली! तिथं खुशाल तरणीं पोरं जमवून धिंगाणा घालीत होतीस तें चालत होतं वाटतं तुला? हसणं काय, खिदळणं काय...

**रेखा**– खबरदार मामी वाटेल तें बोलाल तर!

**म्हाळसा**– कां ग? आता कां मिरच्या झोंबल्या? वाटेल तसले थेर केलेस तिथं, तेव्हा नाही वाटतं अपमान झाला तुझा? बरी पण खाशी खोड मोडली त्या तुझ्या आवडत्या सुरेशनं! कसा दाखवला ठेंगा! आधी नाचूं दिलं अन् आता फेकून दिलं!...

**रेखा**–( दुःखाने विव्हल होऊन ) मामी, मामी! नका हो असं वैर साधूं. ( मूर्च्छा येऊन पडते. तिला अवंतीबाई सावरून धरतात )

**अवंती**– रेखा, रेखा, असं काय करतेस वेड्यासारखं? किती संताप करून घेतेस जिवाचा! जरा शांत हो.

**रेखा**– कोण? बाई, तुम्ही? अन् इथं कशा? आजकाल आमच्या घरांत बाहेरचं मनुष्य काय, पण वारादेखील यायचा बंद झालाय्!

**म्हाळसा**– बघा कुजकं बोलणं बयाचं! म्हणे वारासुद्धा बंद झालाय्! मग आल्यागेल्याला घर मोकळं ठेवून काय त्याची धर्मशाळा करूं होय ग? तुझं ठीक आहे. नेलं कुणीं घर धुवून तर तुझं काय जाणार आहे? मला माझ्या पोरीचं हित बघितलं पाहिजे.

**रेखा**– तें बघितलं असतं तरी हरकत नव्हती. पण तुमच्या मूर्खपणानं त्या अडाण्या पोरीच्या जन्माची माती अन् आमच्या घराण्याच्या बेअब्रूची वेळ आली आहे; त्याचंच वाईट वाटतं, दुसरं काय?

**म्हाळसा**–कुणाला ग मूर्ख म्हणतेस? लहान तोंडीं मोठा घास घ्यायला लाज नाही का वाटत तुला? कालीजांत जाऊन हेंच शिकलीस वाटतं दोन वर्षं? तरी बरं, जावयांना सांगून बंद केलं शिकायचं या वर्षीं म्हणून. नाहीतर धिंडवडेच काढले असतेस बापाच्या अब्रूचे...

**रेखा** – हो ! तुम्हीं ती शिल्लक ठेवली असली तर काढीन खरंच. आपली धिंडका घरांत आली त्या वेळींच रावबहादुरांच्या अब्रूची पताका वेशीवर टांगली.

**अवंती** – रेखा, रेखा, तोंड आटप बाअी.

**म्हाळसा** – आटपती आहे तोंड. अेकुलती अेक लेक म्हणून लाडावून ठेवली आहे ना बापानं ! पण खूप लक्षांत ठेव तूं ! आता पहिले दिवस राहिले नाहीत.

**रेखा** – तें मला सांगायला कशाला हवं मामी तुम्हीं ? खूप वाटेल तें सांगून कान भरलेत बाबांचे अन् मला अशी डांबून ठेवलीन म्हणून शरण का येणार आहें मी तुम्हाला ?

**म्हाळसा**– अैकलंत बाअी ! म्हणे आम्हीं डांबून ठेवली आहे हिला ! शोभतं का हें बोलणं ? तरणीताठी पोरगी. हिला काय वाऱ्यावर मोकळं सोडायचं ? तिला नाही तरी अब्रूची चाड आम्हांला आहे ना ? अन् मोकळं सोडण्याचा काय परिणाम होतो ह्याचा अनुभव आहेच की बापाला ! बरं तर बरं, रंगराव तसा समजूतदार म्हणून पत्करायला तयार झालाय्. नाहीतर बापाला जन्मभर ही बेअब्रूची निशाणी गळ्यांत बांधून हिंडायची वेळ आली होती ! जरा रीत लावायसाठी...

**रेखा** – मला रीत लावण्याच्या आधी आपल्या मुलीला लावा. तुमच्यासाठी नव्हे; तर आमच्या घरासाठी ही विनंती हात जोडून करते तुम्हाला. काय तें नाचणं अन् धावणं ! घरांत तर घटकाभर पाय नसतो बाअीचा ! नाटक, सिनेमा, नाच अन् तमाशा ! दुकानांतून काय आणून खायचं, त्याला तर सुमारच नाही ! बाजारांत किती खरेदी करायची, त्याला हिशेब नाही ! कानांत वारं शिरलेल्या वासरासारखी झालीय् तिची अवस्था ! भिकाऱ्याच्या दृष्टीला कधी नव्हे तो पैसा पडला की अेकदम...

**म्हाळसा**– बरं बरं! असेल माझी लेक भिकारी! पण आता तर मालकीण झालीय् ना ती या घराची? वाटेल ती चैन करील. तिला काय कमी आहे? तुझ्या कां डोळ्यांत खुपतं तिचं सुख? अशीच का, याहूनहि चैन करील ती.

**रेखा** – करू द्या. तुमचेच डोळे पांढरे होतील त्यामुळं अेखादे वेळीं.

**अवंती** – रेखा, कुणाला अन् केव्हा बोलावं याचं तारतम्य ठेवलं पाहिजे बाळ.

**रेखा** – कसलं तारतम्य आलं आहे? बाअी! तुम्हीसुद्धा तोंड-देखलं बोलूं लागलांत का? छ! या जगांत विश्वास असा आता अुरला नाही कुणाचा. ( जाते )

**म्हाळसा** – पाहिलंत? आहे का तिला माणसाची कांही किंमत? तुम्ही तर तिच्या पहिल्यापासून ओळखीच्या; पण तुमची तरी किंमत ठेवलीन् का तिनं?

**अवंती** – छे. अगदीच वाया गेलेली दिसते आहे पोरगी. तिची जरा कानअुघाडणी केली पाहिजे मला.

**म्हाळसा** – कांही अुपयोग व्हायचा नाही मास्तरीणबाअी त्याचा. आता तुम्ही आपलं बघा प्रयत्न करून. ( अवंती जाते )

**चंद्रा** – ( भडक फॅशनेबल वेषभूषा केलेली, थयथय करीत प्रवेश करून ) आअी, कशाला ग हाक मारलीस? मी तिकडे शिवा-शिवी खेळत होतें बागेंत रंगरावाशीं.

**म्हाळसा** – शिवाशिवी? चंद्रे, कार्टे! अग, तूं आता रावबहादुरीण झालीस. तुझ्या योग्यतेप्रमाणं तुला आता वागायला हवं. चार लोकांत नवऱ्याबरोबर तुला आता हिंडाफिरायचं आहे, तेव्हा जरा शहाणपण शीक. अन् तो मेला रंग्या तर असा हलकट आहे! खाणावळींत अुष्टीं काढीत होता. मीं म्हटलं, आहे मेला अुफराट्या काळजाचा, कसल्याहि कामाला मागं नाही सरायचा ...

**चंद्रा–** म्हणजे ग काय आओी ?

**म्हाळसा–** अग, खोटें दस्तऐवज केल्याबद्दल तर त्याला शिक्षा झाली होती ना ? पाहील तसं अक्षर काढण्यांत पटाओीत आहे अगदी ! परवा तर मेल्यानं बेमालूम केलं आहे तेवढं काम.

**चंद्रा–** कसलं ग काम आओी ?

**म्हाळसा–** अग, त्या कार्टीचा नक्षा अुतरवायचा होता ना मला ! तिच्या त्या सुरेशच्या अक्षरासारखं अक्षर काढून लिहिलंन् पत्र अेक की निकालच लागला तिच्या गमजांचा ! तीन दिवस जागची अुठली नाही की जेवली नाही. असं आपलं बस्तान अिथं नीट बसवायला चांगला अुपयोगी पडेल म्हणून बोलावून घेतलं त्याला तर तो मेला शेफारलाच ! थांब. त्याची खरडपट्टी काढतें चांगली. शिवा-शिवी खेळतात म्हणे !

**चंद्रा–** मग ग काय झालं त्यांत, आओी ? त्या सिनेमांत नाही का ती बाओी अशी शिवाशिवी खेळत ? रंगराव म्हणाले, ‘मी तुला तसं शिकवतों.’

**म्हाळसा–** ढालगज कार्टी ! सगळ्या माणसांत हिचं वजन बसावं म्हणून आटापिटा करतें आहें मी जिवाचा. पण हिचं लक्ष आपलं धांगडधिंग्यांत ! आज गाण्याची तालीम केलीस का ?

**चंद्रा–** अे आओी, मला नाही बाओी आवडत तें मास्तरांचं गाणं. त्याचा अर्थच कळत नाही. सा रे ग म प ध नि सा म्हणजे ग काय ? त्यापेक्षा रंगरावच शिकवूं देत गाणं मला. त्यांना किती छानछान गाणीं येतात ! सिनेमांतलीं, नाटकांतलीं. “**राया सोड ना, राया थांब ना, तुझ्या हाताची मिठी जरा सोड ना ...**” (गाणें म्हणत व हावभाव करीत म्हाळसाबाओीजवळ जाते. ती तिला झिडकारून दटावते)

**म्हाळसा**– चंद्रे, तोंड आटपतेस की नाही आता ? जा बघूं. जावयांची आंघोळ झाली असली तर दूध नेअून दे त्यांना.

**चंद्रा**– मी नाही गडे आअी. स्वयंपाकाच्या काकू देतील की नेअून. नाहीतर तूं दे वाटलं तर.

**म्हाळसा**– कार्टीला कळत नाही म्हणतें तें हेंच. अग, तूं त्यांची म्हातारपणची बायको आहेस. सारखा त्यांच्याभोवती पिंगा घालून त्यांना मुठींत ठेवलंस तरच सगळं राज्य तुझं आहे.

**चंद्रा**– मला नाही बाअी आवडत त्यांच्याशीं बोलायला. काय ग बोलायचं त्यांच्याशीं ? त्यांना काय रंगरावांसारख्या जमतीजमतीच्या गोष्टी सांगायला येतात की काय ! रंगराव किती छान गोष्टी सांगतात.

**म्हाळसा**– हें बघ चंद्रे, रंगरावाला सारखा तुझ्याबरोबर नको हिंडवीत जाअूं. त्याला त्या रेखाला छळायला जिथंतिथं मोकळा राहूं द्या. अितकं हें झालंय् तरी त्या कार्टीच्या अंगांतली मस्ती गेलीय् का बघा ! म्हणे शरण नाही येणार ! बघतेंच कशी येत नाहीस ती ! मी पण नांवाची म्हाळसाबाअी आहें म्हणावं ! करती काय म्हणा आता ? येअूनजाअून कोण सुरेश की फिरेश– त्याच्या-वर हिच्या साऱ्या गरजा ! पण त्याचा तर बंदोबस्त चांगलाच झालाय्. पण अेवढ्यानं कांही भागलं नाही ! अशीच मोकळी राहिली तर केव्हा अन् कुठं निसटून जाअील नेम नाही. त्या रंग्याच्या गळ्यांत बांधायचा विचार केलाय् मीं; मग जाते कुठं ? तसं करीन तरच नांवाची म्हाळसा ! म्हणून तुला म्हणतें चंद्रे, की त्याला नको नेअूं सारखा.

**चंद्रा**– तें नाही बाअी जमायचं, आअी. रंगराव बरोबर असल्याखेरीज मी सिनेमाला, सर्कस पाहायला अन् हॉटेलांत कशी ग जाअूं ? आअी, काल आम्ही त्या हॉटेलांत गेलों होतों ना ? तिथं काय मजा होती म्हणतेस ! गादीच्या खुर्च्या, फिरता पंखा अन् खायला तरी काय ( जिभल्या चाटीत ) काय गमतीदार पदार्थ होते

म्हणतेस ! मीं अन् रंगरावांनी खूप खाल्लं बघ तिथं ! अन् काय अेकेक बायका आल्या होत्या तिथं. अेकीकीचीं पातळं तऱ्हतऱ्हेचीं. आअी, तसलीं खूप पातळं घ्यायचीं आहेत मला. सांगून आलें आहें मी दुकानांत.

**म्हाळसा**— अग, पण तुला नको का म्हणतं आहे कुणी ? माझं म्हणणं अेवढंच, की...

**चंद्रा**— राहूं दे ग तुझं म्हणं. आधी माझं अैकून घे. किनअी आअी, तिथल्या त्या बायका होत्या ना ? त्या त्यांच्याबरोबरच्या पुरुषांच्या अंगावर रेलायच्या काय, चापट्या काय मारायच्या अेकमेकाला, आणखी बघ वाटेल तें करीत होत्या त्या ! मला फार गंमत वाटली त्यांची. रंगराव म्हणाले, 'त्या कांही नवऱ्यांच्या बायका नाहीत.' खरंच, नाहीतरी नवऱ्याबरोबर का असली मजा करतां येते ?

**म्हाळसा**—चंद्रे, तूं तरी फारच फाजीलपणा करायला लागलीस हो दिवसेंदिवस ! थांब, तुलासुद्धा घराबाहेर सोडतां कामा नये.

**चंद्रा**—हं, म्हणे घराबाहेर सोडणार नाही ! तूं मला काय रेखा समजलीस होय ? वाट्टेल तें करणार जा मी. अुगीचच्या अुगीच त्रास द्यायला लागलीस तर त्यांना सांगेन बघ तुझं सारं कारस्थान. अे, आता कशी भ्याली ! म्हणे बाहेर सोडीत नाही !

**म्हाळसा**—(जरा वरमून) बरं पण चंद्रे, हा पोरकटपणा तुला आता शोभत नाही बरं का. जरा तरी आपल्या नवऱ्याकडे अन् संसाराकडे लक्ष दे की.

**चंद्रा**—अिश्श ! मला नको ग बाअी तो संसार अन् ती अुठाठेव ! तू आहेस की तें सारं करायला.

**म्हाळसा**— अग, मी करणार तें तरी सारं तुझ्याच जिवावर ना ? गोड बोलून अेक जावयाची मर्जी तूं सांभाळलीस की बाकीचं सारं बघतें मी. रेखेचा सारा ढालगजपणा सांगून अशी आग देतें पेटवून की होरपळून निघाली पाहिजे !

**चंद्रा**–मला कां ऽ ही सांगूं नको आऔी या गोष्टी ! म्हाताऱ्या नवऱ्याशीं माझं लग्न ग कां केलंस ? तुला अधिकार गाजवायची होस होती अन् मला चैन करायला हवी होती. अितके दिवस भांडीं घासून अन् धुणीं धुअून हाताला घट्टे पडले आहेत माझ्या. बस्स ! आता मी माझ्या मनाला वाटेल तशी चैन करणार ! तुला गरज असली तर तूं बैस त्या म्हाताऱ्याची मर्जी सांभाळीत. ( जाते )

**म्हाळसा**– ( कपाळाला हात लावून जाते )

(अवंतिका व रेखा बोलतबोलत प्रवेश करतात.)

**रेखा**– बाऔी, क्षमा करा मला, मघाशी तुम्हाला ताड्कन् बोललें म्हणून. पण अति विचारानं अन् निराशेनं मनावरचा ताबा अुडून गेला आहे माझ्या.

**अवंती**– जाअूंद्या रेखा, त्याचं काय अेवढं मनाला लावून घेतेस ? मला कांहीसुद्धा वाटलं नाही त्याचं. पण तूं अशी त्रास करून घेअूं नको बाऔी जिवाला. हें बघ, माणसानं आशा सोडूं नये.

**रेखा**–बाऔी, कसली आशा धरूं आता मी ? घरांतला हा धिंगाणा अन् बाबांची ती घरांतली कठोर वागणूक याचंसुद्धा मीं कांही मानलं नसतं. पण...सुरेश...त्यांनी कां बरं असा विश्वासघात करावा ? घर फिरलं की त्याचे वासेहि फिरूं लागतात म्हणे ! ज्याच्यावर प्राणापलीकडे प्रेम केलं त्या माणसानं असा केसानं गळा कापावा ? खरंच सुरेश, हीं दुष्ट अक्षरं लिहवलीं तरी कशीं तुमच्या लेखणीला ? म्हणे ' तुझा-माझा संबंध संपला !... यापुढं माझ्याशीं पत्रव्यवहार करूं नको !... '

**अवंती**– असं लिहिलंन् म्हणतेस ?

**रेखा**– हो, हेच ते शब्द. कसं अगदी काळीज कापीत गेले माझं !

**अवंती**– कुठं आहे तें पत्र ? दे पाहूं माझ्याजवळ. अन् जातें मी आता अेकदा त्या बयाला भेटून. अन् हें बघ, असा धीर सोडूं

नको. निघेल, यांतूनहि अेखादा मार्ग निघेल. ( रेखेला जवळ घेअून तिचें सांत्वन करतांना पडदा पडतो )

०००

## प्रवेश २ रा

( रस्ता. अवंती व माणिक प्रवेश करतात )

**माणिक** – बाअी, तुमच्या मंडळाची ही कल्पना बरोबर वाटते; पण कसंसंच होतं बाअी यायला.

**अवंती** – अग, आपल्याला अशी सवय नसते म्हणून होतं तसं. पण असं लाजून ग कसं चालणार? तूं यायला लाग मंडळांत हं!

**माणिक** – बरं बाअी. तुम्हीच आहांत म्हणून धीर होतोय्. बरं, येतें मी. हें घर आलंच माझं. ( जाते )

**यमू** – ( प्रवेश करून ) बाअी, घरीं चला ना! कित्ती माणसं येअून चोकशी करून गेलीं तुमची! ते व्यायाम मंडळाचे चिटणीस तर वाट पाहात बसले आहेत. आपल्या सेवा-मंदिराच्या व्यवस्थापिका त्या शेवंतीबाअी 'जराशानं येतें' असं सांगून गेल्या आहेत. म्हणून मी बोलवायला निघालें होतें तुम्हाला.

**अवंती** – असं झालं होय? बराच खोळंबा झाला मग सगळ्या कामाचा? अग, पण करूं काय? झाला बाअी अुशीर जरा.

**यमू** – कुठं गेलां होतांत?

**अवंती** अग, रेखेच्या घरीं. त्या म्हाळसाबाअींचा निरोप आला होता.

**यमू** – कुठं? रेखेच्या घरीं? मग? कशी काय आहे हकीगत?

**अवंती** – हकीगत काय विचारतेस, यमू? आपण अैकली त्याहून कितीतरी वाअीट आहे रेखेची स्थिति! काय त्या म्हाळसा-

बाओीचा अवतार ! काय त्या चंद्राबाओीचा थिल्लरपणा ! अन् रंगरावाची ती हलकट वागणूक ! घटकाभर तिथं राहिलं तर डोकं कसं सुन्न होऊन गेलं अगदी ! अन् मग रेखेला सारा दिवस किती असह्य होत असेल तें सारं... ?

**यमू**– होय ना ! बिचारी रेखा घराबाहेरदेखील पडत नाही आताशा पाहिलं तें.

**अवंती**– पडेल कशी ? सक्त ताकीद दिली आहे बाबासाहेबांनी तिला, या महामायेच्या सांगण्यावरून !

**यमू**– काय ग बाओी छळ चालवलाय् मेलीनं !

**अवंती**– अग, ओवढ्यानं कुठं झालंय् ? त्या बयाचा खरा डाव आहे तो निराळाच !

**यमू**– तो कोणता आणिक ?

**अवंती**– अग, तिनं तो रंगराव म्हणून कोण टोळभैरव आणला आहे ना घरांत ? ओखाद्या बदमाष गुन्हेगारासारखा दिसतो मेला ! ही म्हाळसाबाओी म्हणते, की तो आपला कुणी नातेवाओीक आहे म्हणून ! अन् त्याला म्हणे चुलत्याची मोठी अिस्टेट मिळायची आहे ! पण मला नाही खरं वाटत. खात्रीनं तिथं कांहीतरी पाणी मुरतंय्.

**यमू**– होय बाओी, वाटतं खरं असं. परवा सखूच सांगत होती नाही का रस्त्यांत भेटली तेव्हा त्याचा हलकटपणा !

**अवंती**– त्याच्याशीं रेखेचं लग्न करण्याचा घाट घातला आहे या बाओीनं.

**यमू**– काय म्हणतां बाओी ? रेखेचं लग्न... अन् असल्या माणसाशीं ? अशक्य !

**अवंती**– होय यमू ! रेखेचं लग्न रंगरावाशीं ! अन् म्हाळसाबाओीनं मनांत आणल्यावर अशक्य काय आहे त्यांत ?

**यमू**– बाओी, खरंच का सांगतां हें ?

**अवंती**– तर काय खोटं ? अजून केव्हा तें नाही ठरलं; पण म्हाळसाबाअींच्या मनांत आल्यावर त्याला तरी काय वेळ ?

**यमू**– बाअी, मग हो काय करायचं ? कशी सुटका व्हायची रेखेची या कारस्थानांतून ?

**अवंती**– तेंच तर सुचेनासं झालंय् मला. रेखेच्या घरांतून बाहेर पडल्यावर त्या आरामबागेंत जाअून तासभर विचार करीत बसलें होतें मी. शिवाय दुसरी अेक भीति वाटते आहे मला. तसाच जर प्रसंग आला तर रेखा आपल्या जिवाचं कांही बरंवाअीट...

**यमू**– अग बाअी... ! ( सखू प्रवेश करते )

**सखू**– बाअी, बऱ्या भेटलासा तुमी वाटंत. त्या चांडाळणीनं सादला बगा दावा !

**अवंती व यमू**– ( घाबरून ) काय झालं ग ?

**म्हाळसा** - अव, लग्नाचा म्होरुत बी ठरवला की तिनं ! आत्ता जेवतांवक्ताला बाबासायबांशीं खलबतं करून अखिरी सादलीच बगा ! मला समाजलं आन् लगीच निगाली तुमास्नी वर्दी द्येया. पन बऱ्या वाटेंतच भेटलां तुमी. ( डोळ्याला पदर लावून ) बाअी, कसं व व्हअील रेकाताअींचं माज्या ?

**अवंती**– सखू, हें बघ, घाबरूं नकोस अशी. अन् हें बघ, घरीं जा अगोदर अन् रेखेवर नीट लक्ष ठेव. नाहीतर भलतंसलतं करून बसेल पोरगी !

**सखू**– व्हय, जातें. पर काय बी करूनशेनी ह्यें कारास्तान मोडाया व्होवं बाअी. नायतर धडगत नाय रेकाताअींची. ( जाते )

**अवंती**– काय करावं बरं ? वेळ तर आणीबाणीची येअून ठेपली !

**यमू**– ( अेकदम घाबरल्यासारखें करून ) बाअी, बाअी ! तो... तो पाहिलांत का दिव्याच्या खांबाखाली अेक अिसम अुभा आहे तो.

**अवंती**– ( विंगमध्ये पाहून ) अगबाअी! तो... पण त्याला पाहून घाबरलीस कां अितकी?

**यमू**– बाअी, ते...ते... माझे पति दिगंबर.

**अवंती**– काय म्हणतेस तूं हें? खरंच?

**यमू**– शंकाच नाही. पण हे अिकडे कुणीकडे? मला कांही त्रास द्यायचा तर विचार नाही ना यांचा?

**अवंती**– खरंच का हा तुझा नवरा आहे, यमू? नाहीतर माणसासारखीं माणसं पुष्कळ असतात, म्हणून विचारतें.

**यमू**– छे हो बाअी! अशी कशी चूक होअील? कसलीसुद्धा शंका नाही.

**अवंती**– अस्सं. मग न घाबरतां तूं नीट घरीं जा कशी. तो बघ तो त्या समोरच्या दुकानांत शिरला. तिथं जाअून गाठ घेतें मी त्याची.

**यमू**– नको बाअी! चला आपल्या घरीं. कशाला अुगीच?

**अवंती**– अैक यमू. मुद्दामच जातें आहें मी. कारण आहे तसंच त्याचं. ( जाते )

**यमू**– काय आहे बाअींच्या मनांत कोण जाणे! मला तर बाअी भीतीच वाटते आहे त्याची! यांचं अिथं येणं...काय होणार देव जाणे!

( पडदा )

ooo

## प्रवेश ३ रा

( परिचय मंडळाची कचेरी. मध्यभागीं टेबल-खुर्ची असून बाजूलाहि कांही खुर्च्या ठेवल्या आहेत. टेबलावर लेखनसाहित्य, कांही कागदपत्रें, फायली वगैरे साहित्य. बाजूच्या स्टुलावर वर्तमानपत्रांचे व मासिकांचे अंक असून



सखू- " बाअी बाअी ! संमदा घात झाला ! कवाचा गोंदूळ चाललाय् घरांत ! "
(अंक २ रा)

त्यांवर अेक पंखाहि ठेवलेला दिसतो. पाठीमागच्या भिंतीवर कॅलेंडर व " येथे चौकशी करणें—सेक्रेटरी, परिचय मंडळ " अशी पाटी. यमू, माणिक व रतन खुर्च्यांवर बोलत बसल्या आहेत.)

**माणिक**— काय रतन, तूं शेवटीं या मंडळांत यायचं नक्की केलंस ना?

**रतन** - होय ग. प्रथम जरा कसंसंच वाटे; पण धीर करून येअूं लागलें.

**माणिक**— पण रतन, या मंडळानं कुमारिकांच्या आयुष्यांतील विवाहाचा प्रश्न सोपा केला तरी याच विवाहपद्धतींतील दोषांमुळं आणिकसुद्धा कित्येक प्रश्न निर्माण होतात ते कसे सोडवायचे? अन् शिवाय तीमुळं केवळ स्त्रियांचीच कुचंबणा होते असं नाही, तर पुरुषांनाहि तोच अनुभव येत नाही का?

**रतन**— होय. हें खरं आहे. पण प्रथम विवाहाचा प्रश्न सुटला म्हणजे पुढच्या पिढींत विवाहसंबंधांतील अितर अडचणी पुष्कळ कमी होतील.

**माणिक**— पण आजच्या समाजांत ज्या व्यक्तींना या सदोष विवाहानं हाल सोसावे लागत आहेत त्याचं काय?

**रतन**— श्ः! यमूताअी आल्या बघ!

**यमू**— (प्रवेशून) काय माणिक, रतन! केव्हा आलां?

**रतन**— फार वेळ नाही झाला येअून. आता ह्याच आलों.

**यमू**— कसं वाटतं मंडळ तुम्हांला?

**माणिक**— वा! चारच महिने झाले मंडळ स्थापन करून; पण ही कल्पना अतिशय लोकप्रिय झाली आहे. प्रथम नवीनपणामुळं अेवढं

यश येअील असं मुळीच वाटत नव्हतं. पण यमूताअी, बाअींना त्रास देत नाहीत का हो कुणी ?

**यमू**– आरंभीं तसा थोडा त्रास झाला; पण बाअींनी त्याची कल्पना केलीच होती. (पोस्टमन– ' सेक्रेटरी, परिचय मंडळ ' अशी हाक देतो.) आलें हं. (जाअून टपाल घेते) हें रोजचं टपाल. अन् प्रत्यक्ष गाठीभेटींसाठी येणाऱ्या मुलांमुलींची संख्या पाहिली म्हणजे या अुपक्रमाची किती जरुरी होती याची साक्ष पटूं लागते.

**रतन**– खरं आहे अगदी. बरं, पण येत्या रविवारचा कार्यक्रम काय ठरला तें विचारायला आलों होतों आम्ही.

**यमू**– येत्या रविवारीं वनभोजनाचा कार्यक्रम आहे बहुधा. पण तुम्ही नुसत्याच या. येत्या कार्यक्रमाची जबाबदारी शकुंतला घेणार आहे.

**माणिक**– बरं. मग जातों आम्ही. (जातात)

**अवंती**– (प्रवेश करून) हं, काय यमूताअी, कालच्या त्या भेटीची भीति आता कांही अुरली नाही ना मनांत ?

**यमू**– बाअी, तुम्ही असतांना कसली आली आहे भीति म्हणा. पहिल्यानं जरा भ्यालें; पण तुम्हीं घरीं आल्यावर सारं सांगितलंत तेव्हा अुलट बरंच वाटलं मला.

**अवंती**– बरं, आज काय आहे टपाल ?

**यमू**– हा बघा ढीग आहे अितका. (खुर्चीवर बसून) बाअी, ही तुमची परिचय मंडळाची कल्पना यशस्वी तर ठरलीच; पण यांत काम करतांना तरुण मुलांमुलींच्या अंतरंगाचं चांगलं निरीक्षण करायला सापडतं आहे आपल्याला, नाही ?

**अवंती**– अन् त्याबरोबर करमणूकहि कांही थोडीथोडकी होत नाही. मघाशीच अेक सद्गृहस्थ आले होते माझ्याकडे. पहिल्यानं

खूप तावातावानं बोलायला लागले. म्हणे, तुम्हीं तरुण मुलांमुलींना बिघडविण्याचे धंदे चालविले आहेत, अमुक झालं अन् तमुक झालं ! अन् मग म्हणतो काय हळूच– ‘ तुमच्या या मंडळांत हुंड्या-खेरीज लग्नं जमतात ना ? मग आमच्या मुलीला सांगा पाहूं अेखादं स्थळ ! तुमची जी फी असेल ती देअीन मी.’

**यमू**– मग तुम्हीं काय सांगितलंत ?

**अवंती**– सांगितलं, ‘ आम्ही अिथं कांही कुणाचीं लग्न जम-वीत नाही ’ म्हणून. ‘ मुलीला वाटलं तर मंडळांत पाठवा, तिची ती नवरा शोधून काढील.’ तशी तो रागारागानं गेला निघून !

**यमू**– अन् कालचे ते म्हातारबोवा ! ते तर स्वत:लाच अेखादी मुलगी पाहून द्या म्हणत होते !

**अवंती**– मुलींच्यासुद्धा कांही कमी जमती नाहीत. परवा संध्याकाळीं त्या मुली आल्या होत्या ना माझ्याकडे ? त्यांतील अेक विचारीत होती, की मंडळांत आल्यावर किती दिवसांत लग्न होअील म्हणून ! अन् दुसरीचं म्हणणं होतं, की मंडळांत आल्यावर श्रीमंत नवरा मिळेल का ?

**यमू**– काल दुपारची गंमत ठाअूक नाही तुम्हाला बाअी. अेक आपला टाकटीक पोशाख केलेला तरुण आला मंडळाची चोकशी करीत. मला वाटलं त्याला मेंबर व्हायचं असेल, म्हणून मीं फॉर्म केला पुढं. तर म्हणतो कसा– ‘ मी आचारी आहें. तुमच्या मंडळांत जीं लग्नं होतील, त्यांचं काम द्या मला. मी तुम्हाला कमि-शन देअीन.’

**अवंती**– बरं चल. आता कामाला लागलं पाहिजे, नाही ? अग, येत्या रविवारीं कसला बरं कार्यक्रम ठेवावा ?

**यमू**– वनभोजनाला जायचं आहे ना नदीकाठीं ? अन् ती सारी व्यवस्था बघायचं शकूनं कबूल केलं आहे.

**अवंती**– खरंच. ती आली नाही ग अजून? (शकू प्रवेश करून– 'आलें हो बाओी!') शाबास! आत्ता आलीस का? मीं म्हटलं येतेस की नाहीस! गरज सरो नि वैद्य मरो असं व्हायचं नाहीतर!

**शकू**– अिश्श! असं हो काय बाओी!

**यमू**– म्हणजे हो काय शकूताओी? काय भानगड आहे ही?

**शकू**– कसली भानगड? बाओींचं आपलं कांहीतरीच!

**अवंती**– कांहीतरीच काय? अिकडे... अिकडे वर बघ बघूं. (शकू लाजून मान खाली घालते) बरं का यमू, गेल्या बुधवारीं आपल्या मंडळाची वादविवाद-बैठक होती ना घरांतच? डोकं दुखतंय् म्हणून तूं निजली होतीस त्या वेळीं. प्रो. फडक्यांच्या 'अिंद्रधनुष्य' या कादंबरीवर चर्चा चालली होती. आमच्या शकूला बोलायचा अगदी जोर चढला होता. पण कशासाठी माहीत आहे का? अेका माणसाला तें अैकून गुदगुल्या होत होत्या म्हणून. अन् मग मंडळी कॉफी पिण्याच्या नादांत गुंतली होती तेव्हा बाहेर व्हरांड्याच्या अेका कोपऱ्यांत...

**शकू**– बाओी...

**अवंती**– बरं राहिलं. नाही सांगत पुढचं. बाकी निवड छानच केलीस हं शकू. महेश्वर मोठा चलाख पोरगा आहे. शिकलासवरला जरी बेताचा तरी धडाडी फार दांडगी आहे त्याची.

**यमू**– अगबाओी! अस्सं होय? बाओी, मला पटली खूण आता. परवा महेश्वरांवरूनच बोलणं निघालं होतं, तेव्हा अेक माणूस काय पण त्यांची वकिली करीत होतं! म्हटलं हें अस्सं कां? तरीच!

**अवंती**– हं, मग काय शकू? कधी आहे लग्नाचा बेत?

**शकू**– (लाजून) पुढच्या महिन्यांत. तंवर महेश्वर आपल्या दुकानाची नीट व्यवस्था लावणार आहेत.

**यमू**– अस्सं ! अेकूण आपण दुकानदारीणबाअी होणार म्हणायच्या ! काय ग, पण आम्हाला आहे का लग्नाचं आमंत्रण ?

**शकू**– तुझा मान तर करवलीचा, यमूताअी !

**अवंती**– अन् माझा ग ?

**शकू**– तुम्ही महेश्वरांच्या सासूबाअी ! छान शोभाल अगदी !

**अवंती**– होय का ? बरं आहे मग. तुमचं लग्न जरी रजिस्टर होणार असलं तरी मान मोडेपर्यंत वाकवून घेअीन बरं का नमस्कारासाठी. सांगून ठेव त्यांना.

**शकू**– ( जरा थांबून गंभीर आवाजांत ) बाअी, अेका गोष्टीचं मात्र राहूनराहून वाअीट वाटतंय् बघा.

**अवंती**– कशाचं ग ?

**शकू**– रेखाताअीचं हो. आमच्या सगळ्या कार्यक्रमांत ती नाही ! किती तिला सगळ्या गोष्टींची हौस आहे नाहीतर. माझं लग्न ठरलेलं तिला सांगायला गेलें मी बघा, तर त्या म्हाळसाबाअीनं तिची भेटसुद्धा घेअूं दिली नाहीन् ! खरंच बाअी, कांहीसुद्धा नाही का हो करतां येणार ?

**यमू**– बाअी, तुम्हीं मुंबअीला कुणालासं लिहिलं होतं ना हो ? सुरेशची चौकशी केली का मग कुणीं ?

**अवंती**– नीटसा पत्ता लागला नाही ग. तो गेल्या वर्षीं पास होतांच नोकरीला लागला आहे; पण कुठं तें कांही समजलं नाही ! अन् त्याचासुद्धा फार गैरसमज झालाय् तिच्याबद्दल, रेखेचं म्हणे त्याला पत्र गेलं होतं, की तिच्यासारख्या श्रीमंत मुलीची त्यानं आशा धरूं नये म्हणून !

**शकू**– अिश्श ! असं कसं लिहील रेखा ?

**यमू**– हें कांहीतरी या जोडगोळीचंच कारस्थान दिसतं आहे !

**म्हाळसा**– ( प्रवेश करून ) बाओी, आहांत का घरांत ? म्हटलं भेटाल की नाही ! अहो, रेखेच्या लग्नाचं नक्की झालं. मुहूर्तसुद्धा जवळचाच धरायला सांगितला आहे जोशीबुवाला. ही आत्ता तिकडूनच आलें मी. दुपारीं हातावर पाणी पडतांच घराबाहेर पडलें आहें. अहो, लग्नच पडलं तें. काय म्हणून बघावं लागत नाही, सांगा ! तसंच वाटेंत तुम्हाला सांगून जावं म्हटलं. अिथं या दोघीहि अनायासेंच भेटल्या म्हणायच्या. तुम्हीं सर्वांनी यायचं बरं का. ( अुपरोधिक आवाजांत ) हो, रेखा तुमची मैत्रीण. तेव्हा तिच्या लग्नाचा विशेष आनंद तुम्हालाच. अग, बघतां काय अशा माझ्या तोंडाकडे ? तुमचीं लग्नंसुद्धा होतील की लवकरच. ( खुर्चीवर बसून ) मास्तरीणबाओी, थोडं पाणी आणा बाओी प्यायला. घसा कसा कोरडा पडलाय् तहानेनं. ( अवंती पाणी आणण्यासाठी जाते. म्हाळसा पंख्यानें वारा घेत हुश्श करीत बसते )

**शकू**– ( अेकीकडे ) बघ, बघ म्हातारडी कशी दुष्ट आहे ती ! मुद्दाम नाक खाजवण्यासाठी अिथं आली आहे ! म्हणे तुम्हांला आनंद होओील हें अैकून ! काय करूं ग यमूताओी ! अस्सा संताप होतो आहे माझ्या अंगाचा की दोन तडाखे द्यावेत ठेवून !

**यमू**– अग हळू ! अुगीच संतापून काय होणार ?

**शकू**– संतापूं नको तर काय करूं ग ? असं वाटतंय्, की कांहीतरी चमत्कार होओून या थेरडीचे दात सपशेल पडावेत !

**यमू**– काय होओील तें खरं. पण चूप बैस बाओी. ती बघ तिची नजर अिकडेच वळूं लागली आहे.

**म्हाळसा**– काय ग, काय पुटपुटतांय् अशा. या की, बसा अिकडे. अन् हें बघा यमूताओी, तुमच्या सेवा-मंदिरांतल्या हलव्याच्या अन् मोत्यांच्या मुंडावळ्या पाहिजेत बरं का आम्हांला. पैसे देओीन मी. अितकंच नव्हे, तर या लग्नाच्या निमित्तानं देणगीसुद्धा

द्यायची आहे माझ्या मनांत कांहीतरी. ( अवंतीबाअी पाणी घेअून येतात, तें पिअून ) बरं बाअी, येतें तर मी. तुम्ही तर घरच्या-सारख्या. तेव्हा तयारी करायला आलं पाहिजे बरं का या मुलींना घेअून. (जाअूं लागते. अितक्यांत सखू घाबऱ्याघाबऱ्या प्रवेश करते)

**सखू**– बाअी, बाअी ! समदा घात झाला ! क्वाचा गोंदूळ चाललाय् घरांत ! मामी... तुमीबी हतंच हाय का ? बाबासायब मगा कचिरींतून घरीं आले अन् बघत्यात तर तिजुरी समदी अुगडी ! दागिनं अन् पैसं न्हैती अन् कापड-चोपाड सारं अिस्काटून टाकलंया !

**म्हाळसा**– म्हणजे चोरी झाली का काय ?

**सखू**– चोरीच. पर चोर काय भाअिरचा न्हाअी ! त्यो रंगराव अन् तुमची ल्येक ! दोगांचा बी पत्ता न्हाअी क्वापून ! चोकशी क्येली तवा कळ्ळं... त्ये दोगं बी गेलं गाडीनं निगून. पळवून की व नेली तिला म्येल्यानं !

( म्हाळसा मट्कन् खाली बसते. बाकीच्या आश्चर्यचकित व किंकर्तव्यमूढ असतांना पडदा पडतो. )

★ ★ ★

# ३

## प्रवेश १ ला

( रेखेचें घर. रेखा वर्तमानपत्र वाचीत बसली आहे. शकू प्रवेश करते )

**रेखा**– ये. बैस.

**शकू**– कशी आहे ग बाबासाहेबांची प्रकृति आता ?

**रेखा**– बरी आहे जरा आता.

**शकू**– काय स्थिति झाली तुमच्या घराची ही ? सहा महिन्यांपूर्वी कुणीं भविष्य केलं असतं तर खरं दिखील वाटलं नसतं कुणाला.

**रेखा**– कशाला बरं बुद्धि झाली बाबांना हें लग्न करायची ! बिचारे ! अितका जबर धक्का बसलाय् या प्रसंगाचा ! मला तर वाटलं त्यांचं डोकंबिकं तर फिरणार नाही ना !

**शकू**– भारीच त्रास झाला त्यांच्या मनाला, नाही ग ?

**रेखा**– छे ! अजूनदेखील आठवण आली की डोकं कसं सुन्न होअून जातं. कुणी मनुष्य समोर दिसलं की चवताळून जातं अन् डोळे असे गरगर फिरवीत की भीतीच वाटे मला !

**शकू**– साहजिक आहे ! ज्या गावांत त्यांनी प्रतिष्ठेनं जन्म काढला त्याच गावांत त्यांच्या अब्रूची अशी धूळधाण व्हावी ! घरीं,

दारीं, बाजारांत कुठंहि जा, चहूकडे आपला अेक विषय—' बाबासाहेबांची बायको पळून गेली ! '

**रेखा**– मानहानीसारखी भयंकर गोष्ट कोणती असूं शकेल ? अन् लोक तरी असले असतात म्हणतेस ! अेरवी वर्षावर्षांत न येणारे लोक आताशा समाचाराला येअून डोकं अुठवूं लागले आहेत ! अन् त्यांतून तो मेला पोलिसांचा ससेमिरा ! त्यांना माहिती सांगतांसांगतां जीव नकोसा झाला !

**शकू**– अन् या मेल्या वर्तमानपत्रवाल्यांचं तर किती फावलं आहे म्हणतेस ! कायकाय अेकेकांनी वर्णनं केलीं होतीं ! अन् मथळे दिले होते भडक, ' म्हातारपणचं संसारसुख, ' ' बत्तिशी घशांत गेली, ' ' तरण्या बायकोनं हातावर तुरी दिल्या, ' ' म्हाताऱ्यांनो, सावधान ! ' अेकन् दोन ! अजूनपर्यंत चालला आहे त्यांचा तो चावटपणा !

**रेखा**– त्यांना कशाला चावट म्हणायचं ? बोलूनचालून ते धंदेवाले. ज्यामुळं वर्तमानपत्रांचा खप होअील अशा बातम्या अन् मथळे छापणारच ते ! बाबांच्या नजरेला शक्यतों कोणतंहि वर्तमानपत्र पडूं नये, अशी मी खबरदारी घेत असतें. पण हीं मेलीं वर्तमानपत्रं विकणारीं पोरं आहेत ना ? तीं रस्त्यावर काय वाटेल तें...(" अेक पैसा ' टवाळी ! ' म्हातारपणीं बायकोचं सुख ! ' टवाळी ' अेक पैसा ! " अशा आरोळ्या पडद्यांत अैकूं येतात ) हें बघ. अैकलंस ? अन् हें अैकलं, की मेल्याहून मेल्यासारखं होतंय् त्यांना.

**शकू**– बाकी रेखाताअी, वाअीटांतूनहि केव्हाकेव्हा चांगलं निघतं, नाही ग ?

**रेखा**– तें काय म्हणतेस ?

**शकू**– अग, चंद्राबाअी रंगरावाबरोबर पळून गेल्या, त्यामुळं तुमचं पैशाचं अन् प्रतिष्ठेचं अपरिमित नुकसान झालं खरं; पण त्यामुळंच तुझ्यावरचं अेक संकट टळलं, नाही का ?

**रेखा**– हं. असं म्हणावं वाटलं तर. पण खरं म्हणशील, तर माझ्याबद्दल विचार करायला मला अजून सवडच झाली नाही.

**शकू**– पण काय ग, या म्हाळसाबाअीनं लग्नाचा अितका घाट घातला असतांना तो रंगराव पळून कां बरं गेला ?

**रेखा**– म्हणजे ? तुला नाही का ठाअूक ही हकीकत ? अग किनअी, रंगराव म्हणजेच यमूचा नवरा दिगंबर. यमू अन् बाअी यांना तो वाटेंत दिसला. यमूनं त्याला तेव्हाच ओळखलंन् अन् बाअींना सांगितलंन्. बाअींनी त्याला समक्ष भेटून सारं अुघड करण्याची जेव्हा धमकी दिली तेव्हा तो घाबरला अन् गेला पळून ! जातांजातां चंद्राबाअीला नेअून त्यानं चांगला हात दाखवलाच ! ती मात्र कल्पना नव्हती हो बाअींना.

**शकू**– अगबाअी ! मोठीच हकीगत आहे मग ही म्हणायची ! बाकी त्या मुलीचं आधीपासूनच हें लक्षण दिसत होतं म्हणा ! छे बाअी ! अितकी स्वैर मुलगी नव्हती पाहिली कधी.

**रेखा**– तिचा तरी काय दोष त्यांत, शकू ? आधी लहान वय, त्यांत शिक्षणाचा व संस्काराचा गंधहि नाही. अशी मुलगी जर अेक-दम पैशाच्या राशीवर येअून बसली तर झाली याहून दुसरी कोणती गत होणार तिची ?

**शकू**– पण रेखाताअी, बाबासाहेबांसारख्या अनुभवी आणि पोक्त गृहस्थांनी अशा मुलीशीं लग्न कसं केलं हेंच मुळी नवल वाटतंय् मोठं !

**रेखा**– अग, त्याचंहि कारण आहे. आअी गेल्यावर स्वतःच्या लग्नाचा विचार जेव्हा बाबांनी चार स्नेहीमंडळींत बोलून दाखवला तेव्हा कांहीजणांनी सांगितलं, की तुम्ही पुनर्विवाह करा. या वयांत कुमारिकेशीं लग्न करणं तुम्हाला शोभणार नाही, अन् कुमारी वधू तुम्हाला मिळायची पण नाही. झालं. बाबा तेवढ्यानंच अिरेला

पडले ! तशांत मुंबअीला ते ज्या गोविंद लॉजमधे अुतरले होते तिथं या म्हाळसाबाअीची गाठ पडली. वस्तादच ती ! साधलान् डाव अन् काय !

**शकू**– खरंच रेखाताअी, काय ही आपली लग्नपद्धति ? लग्नाचा हेतु म्हणजे दोन जिवांचं मीलन होअून कुटुंबाला स्थैर्य यावं हा आहे ना ? पण या असल्या लग्नांनी मीलन तर बाजूलाच राहिलं पण अितर अनेक मनं दुखवलीं जाअून कुटुंबांचा सत्यानाश होतो तो निराळाच !

**रेखा**– कां बाअीसाहेब ? आपलं साधून घेतलंत म्हणून आता लग्नपद्धतीवर व्याख्यानं झोडायला लागलांत वाटतं ?

**शकू**– अिश्श ! ही तुझी कसली ग चेष्टा ? पण मी म्हणतें तें खरं आहे की नाही सांग. बाकी त्या म्हाळसाबाअीची मात्र पुरती फजिती झाली, नाही ग ?

**रेखा**– तें कांही विचारूं नकोस. त्या दिवसापासून डोकं वर झालं नाही तिचं ! अन् त्यांतून जरा कुठं तोंड अुघडलंन् की आमची सखू आहेच तिचा समाचार घ्यायला. तिचं नांव निघालं की बाबा तरी असे संतापतात ! मग तिचं त्यांच्यापुढं जाणं तर दूरच !

**शकू**– काय काय दंगल माजविली होती बयानं ! छे छे ! घे म्हणावं आता प्रायश्चित्त. (पडद्यांत–' चांडाळणी, नीघ माझ्या घरांतून. माझ्या अन्नाचे धिंडवडे काढून पुन्हा माझ्यासमोर मिरवतेस ! हो चालती. हो, आधी घराबाहेर हो ! सखू, हिला आधी बाहेर काढ पाहूं !' असा बाबासाहेबांचा आवाज. रेखा दचकते. )

**रेखा**– अगबाअी ! बाबाच हे ! कशाला गेली ही म्हातारी त्यांच्यासमोर ? तरी त्यांच्या दृष्टीला पडूं नको म्हणून सांगितलंय्. थांब हं. मी बाबांना जरा शांत करून येतें. (आंत जाते. म्हाळसा डोळ्याला पदर लावलेली अशी केविलवाणी प्रवेश करते. पाठोपाठ येतेवेळीं आणलेली तिची ट्रंक घेअून सखू येते. )

**सखू**– हां, चला बेगी बेगी. या घराची पायरी आत्ता अुतराया होवी म्हून सांगितलंया बाबासायबांनी. (आंतून तिचें सामान आणून देअूं लागते) हं, ह्यें पळपुट-लाटनं...ह्यें पायजेच की बरूबर. त्याच्याबिगार काय करनार तुमी? आन् ह्यें सचळं. (अेक कळकट फाटका मुकटा दाखवते) न्हाअूंया ह्यें बी. आन् ह्यें काय? तप-किरीची डबी जनू! (जस्ती डबी दाखवते) अिथं आल्यावर मोटया दिमाकानं चांदीची डबी करून घेतली व्हती नव्ह का. ती न्हाअील की आता मला. (अेकेक जिन्नस ट्रंकेंत भरते) अन् ह्यें हो काय? माळ दिसतीया. देवाच्या नांवानं येक मनी तरी कवा वडला असंल का या बयानं? न्हाअूंद्या ही माळ बी. केलेल्या खोटया कामाची गिनती कराया अुपिगी पडेल की जलमभर. हं, चला आवरा समदं!

**म्हाळसा**– सखूबाअी, नको ग असं करूं. जाणार तरी कुठं मी आता?

**सखू**– कां बरं? चुलीपासली तुमची गादी कायमच हाय की!

**म्हाळसा**– अरे देवा! मागल्या जल्मीं काय पाप केलं होतं म्हणून...

**सखू**– मागल्या जल्मीं कशाला? याच जलमांत रांजान भरलं असत्याल की चांगलं! चार दिसांची सत्ता हातांत आल्याबराबर का ग बया अिकती नाचाया लागलीस? या हातावरचं झाड त्या हातांवर. हं चला, आवरा! (सामान घेते)

**म्हाळसा**– थांब ग. नको अशी कुत्र्यासारखं करूंस. शकु-ताअी, बघितलंस का कशी बोलते आहे ती?

**सखू**– सम्दं बगितलं सगळ्यांनी. शकू काय बगतीया. त्या दिवशीं ती आली व्हती ताअीस्नी भेटाया तवा कुत्र्यावानी त्वांड टाकलंस तिच्यावर त्यें अिसरली नसंल ती अजून. पर तुमी अदुगर ह्यें बिराड अुचला बगूं हतनं.

**म्हाळसा**– देवा ! कसा रे प्रसंग आणलास माझ्यावर ! माझी चंद्री...

**सखू**– गेली असंल तिकडं तुमी बी जा की. येतावक्ताला जसं तिरकुट आलं, तसं जातांना कां न्हाओ गेलां ? पर इतनं अुटा बघूं तुमी ! भाअीर चला आन् मंग बाकीच्या चोकशी करा ! काय पर गुनाची ल्येक होती ! ( तिच्या दंडाला धरून ओढते. म्हाळसा गयावया करूं लागते. रेखा प्रवेश करते. )

**रेखा**– सखू, काय चालवलं आहेस हें तूं ?

**सखू**– सायबांनी सांगितलंय अदुगर ह्येस्नी भाअीर काढ म्हून अन् म्या काय करतीया ?

**म्हाळसा**– रेखाताअी, तुझ्यापुढं पदर पसरतें ग ! पण नको मला अशी घराबाहेर लोटूं. सांगशील तें काम करीन अन् म्हणशील तिथं पडून राहीन. तुला मीं त्रास दिला, तुझ्या प्रेमांत बिब्बा घातला, फार दुःख दिलं मीं तुला. पण आता दया कर अेवढी. ( पायां पडण्यासाठी खाली वाकते )

**रेखा**– मामी, हें काय ? अुठा ! झालं गेलं त्याचा अुच्चार कशाला करतां आता ? सखू, राहूं दे तें सामान. तूं जा आता आपल्या कामाला.

**सखू**– ताअी, तुमचं काय बी नाय अैकनार मी या वक्ताला. बाबासाब येत्याल माज्यावर रागाला. चला मामी तुमी. अुगीच ताअीस्नी रडून दाकवूं नका.

**रेखा**– राहूं दे सखू. बाबांच्या रागाचं मी पाहून घेअीन; मग तर झालं ना ? हें बघ, मेलेल्याला मारण्यांत काय ग अर्थ आहे ?

**सखू**– मेल्यालं ! ताअी, येड्या तर न्हैसा तुमी ? अव, माजं अैका. सापाला दूद पाजूं नका.

**रेखा–** असूं दे ग. साप असला तरी त्याचे दात आता पडून गेले आहेत. राहूं दे तें सामान. ( सखू ' बरं बाअी ' म्हणून नाखुषीने निघून जाते ) अन् मामी, तुम्हीहि चला घरांत. बाबांच्या दृष्टीला मुळीच पडूं नका पुन्हा.

**म्हाळसा–** मी कशाला हें काळं तोंड घेअून त्यांच्यापुढं जातें आहे ! सांगशील तिथं सांदीकोपऱ्यांत पडून राहीन. करायचं काय ? आपलं कर्म फुटकं !

**सखू–** ( अेक पत्र घेअून येते ) ताअी, हय बगा.

**रेखा–** ( पत्र वाचतांना आश्चर्याने ) अग शकू, चंद्राताअी सापडल्या म्हणे !

**शकू–** खरंच ? कुठं ? कशी ?

**रेखा–** बाअी धारानगरीला गेल्या आहेत ना ? त्यांचं पत्र आलं आहे हें. वाचूनच दाखवतें, अैक– " अिथं भाअूसाहेब नांवाचे अेक वकील आहेत. त्यांना पंधरा दिवसांपूर्वी प्रवासांत अेक अनाथ मुलगी आढळली. कुणीतरी बदमाषानं तिला फसवून लुबाडून रस्त्यांतच सोडून दिलं होतं व त्यांनी दयाळूपणानं तिला घरीं आणली. पुढं तिची काय व्यवस्था करावयाची या विचारांत ते असतांच त्यांची व माझी गाठ पडली. मीं तिची पुढील जबाबदारी घ्यावी अशी विनंती करून शंभर रुपये देणगीसह ती मुलगी माझ्या हवालीं केली. पण चमत्कार असा, की ही मुलगी म्हणजेच चंद्राबाअी होय ! तिला घेअून मी आता निघत आहें. अधिकोत्तर भेटींत. "

**सखू–** सापडली खरं. पर करायचीय् काय घेअून आता तिला ? फुटल्यालं भांडं अन् बाटल्याली बायकू काय कामाची ?

**रेखा–** सखू, तूं जा बघूं निमूटपणानं आपल्या कामाला. ( सखू जाते. )

**शकू–** रेखाताअी, मीहि जातें बरं का.

**रेखा**– कां ग ? महेश्वर वाट पाहात असतील होय ? बरं जा बाअी. बाअींच्याकडे गाठ पडेलच आपली. ( शकू जाते ) मध्यंतरीं आमच्या घराला जें ग्रहण लागलं होतं, तें अशा रीतीनं सुटत चाललं आहे म्हणायचं. रंगरावाला पकडलं, त्यानं लांबवलेला बराच माल आम्हांला परत मिळाला अन् आता बाअी लिहितात, की चंद्राताअी पण सापडल्या म्हणून. पण या कारस्थानांत माझं हरवलेलं सर्वस्व... सुरेश... सुरेश... कुठं आहांत तुम्ही ?

**[ पडदा ]**

०००

## प्रवेश २ रा

( रस्ता– रतन व माणिक प्रवेश करतात )

**रतन**– माणिक, अे माणिक ! थांब ना जरा. किती ग हाका मारायच्या तुला ?

**माणिक**– मीं नाही ग अैकल्या, रतन. नाहीतर थांबलें नसतें का ?

**रतन**– अिश्श ! म्हणे अैकल्या नाहीत. रस्त्यावरचीं माणसं-सुद्धा माझ्याकडे बघायला लागलीं आहेत. अितकी ग कसल्या नादांत होतीस ?

**माणिक**– अग, आता अेक विलक्षण बातमी अैकली, तिचा विचार करीत होतें.

**रतन**– ती ग कसली ?

**माणिक**– अग, बाबासाहेबांची ती पळून गेलेली बायको म्हणे परत आली !

**रतन**– होय ? अन् मग आता ?

**माणिक**– अग, आपल्या बाओीच तिला परत घेऊन आल्या धारानगरीहून. शिवाय बाओींचं म्हणणं असं, की बाबासाहेबांनी तिला घरांत घ्यावी.

**रतन**– अिश्श ! काय बोलणं का काय तरी ! खुशाल अेका मवाल्याचा हात धरून पळून गेलेली बायको अन् तिला घरांत घ्यायची ? लोक तोंड तरी काढूं देतील का बाबासाहेबांना ? आधी ती पळून गेलेली म्हणूनच त्यांची फटफजिती झाली आहे ! अन् मग तिला घरांत घेतल्यावर विचारायलाच नको !

**माणिक**– पण काय ग झालं घेतली म्हणून ? माणसाच्या हातून काय चूक होत नाही ?

**रतन**– ही चूक कसली माणिक ? गाढवचूक आहे ही ! बाय-कांची अब्रू काचेच्या भांड्यासारखी. अेकदा तडा गेला की गेलं तें भांडं कामांतून !

**माणिक**– रतन, तुझ्यासारख्या तरुण सुशिक्षित मुलीनं तरी असं बोलूं नये. चंद्राबाओी पळून गेली ही काय सारी तिचीच चूक म्हणतां येअील होय ? अग, तिच्या मनावर लहानपणापासून जर चांगले संस्कार झाले असते अन् तिचं लग्न अेखाद्या जोडीच्या नव-ऱ्याशीं झालं असतं तर ती गेली असती का पळून ? तिची ही सारी परिस्थितीच याला जबाबदार नाही का ?

**रतन**– पुरे ग ! तुझं हें ठराविक व्याख्यान सुरू झालं वाटतं ? कारण कांही असो. ती पळून गेली हें कांही खोटं नाही ना ? मग तिला पहिल्या घरीं यायचा काय अधिकार ? ज्यानं गुन्हा केला त्यानं शिक्षा भोगलीच पाहिजे.

**माणिक**– शिक्षा ही गुन्हेगाराची सुधारणा व्हावी म्हणूनच ना द्यायची असते ? असल्या शिक्षेनं गुन्हेगाराची सुधारणा होण्याअैवजी तो बिघडण्याचा संभव अधिक. याचीं हजारों अुदाहरणं पाहा-



रेखा - "हॅलो ! कोण ? सुरेश ?... काय अैकतें आहें मी हें ?"  (अंक ३ रा)

तोंच ना आपण ? जी बाअी अेकदा कोणत्याहि कारणानं घरांतून अुठली तिला परत येण्याची आशा म्हणून नाही.

**रतन**– पण अशा बायका समाजांत अुजळ माथ्यानं वावरूं लागल्या तर त्यांच्यांत अन् आमच्यांत फरक काय अुरला ?

**माणिक**– अस्सं ! म्हणजे आपली प्रतिष्ठा मिरवण्यासाटी त्यांना पायदळीं तुडवणार तुम्ही, होय ना ?

**रतन**– असंच नाही कांही. पण हें बघ, या बायका म्हणजे रोगजंतूंसारख्या आहेत. त्या जर समाजांत मिसळल्या तर स्वतःप्रमाणं बाकीच्यांनाहि बिघडवतील.

**माणिक**– कशावरून म्हणतेस तूं हें ? असे कितीसे प्रयोग करून पाहिले आहेत समाजानं अन् त्यांत आपल्याला असं आढळून आलंय् ? अनुभव आल्याखेरीज वाटेल तें विधान कां करावं ?

**रतन**– नसायला काय झालं अनुभव ? त्या पेंडशांचं अुदाहरण माहीत नाही का तुला ? आर्यसमाजानं सोडवून आणलेल्या त्या मुलीशीं लग्न केलंन् अन् आपल्या गणागोताला मुकला ! अन् शेवटीं ती बया बेअिमान निघाली ती निघालीच !

**माणिक**– आहे माहीत तें मला सारं. पण त्यांतली खरी हकीकत ठाअूक नाही तुला. पेंडशांनी पहिल्यानं लोकांत वजन मारण्यासाठी तिच्याशीं लग्न केलं खरं; पण पुढं त्यांचं अेका श्रीमंत पोरीशीं सूत जमतांच तिचा काटा काढून टाकण्यासाठी घेतलान् तिच्यावर आळ ? साऱ्या लोकांना त्यांचंच खरं वाटलं. कारण त्यांनी केवढा स्वार्थत्याग केला होता तिच्यासाठी ! हिचं बिचारीचं अैकणार कोण ? कारण अेकदा नांवाला बाट लागला होता ना ?

**रतन**– खरंच का असा प्रकार आहे या पेंडसे-प्रकरणाचा ?

**माणिक**– मग खोटं का सांगतें आहें तुला ? अन् असल्या बाबतींत नेहमी वाअीट अुदाहरणंच तेवढीं आपण डोळ्यांपुढं ठेवतों.

अेकदा आगींत होरपळून पश्चात्तापानं पावन झालेल्या अन् अितरां-सारखंच शुद्ध, सात्त्विक जीवन जगूं पाहणाऱ्या बिचाऱ्या दुर्दैवी स्त्रिया दिसतच नाहीत आपल्याला. आपण सुशिक्षित बायकांनीच आपल्या या बहिणींची अशी अवहेलना केली तर त्यांनी बघायचं तरी कुणाच्या तोंडाकडे ?

**रतन**–बरं बाअी. राहिलं माझं. तूं अन् मी या प्रकरणांत अुगीचच वाद घालीत बसलों. आपल्या हातांत आहे काय ?

**माणिक**– कां बरं ? सगळं आपल्याच हातांत आहे की. समज, बाबासाहेबांनी आपल्या बायकोला पुन्हा घरांत घेतलं अन् आपण साऱ्या बायका तुच्छतेनं तिच्याकडे पाहूं लागलों, तिला घालूनपाडून बोलूं लागलों, तिच्या पूर्वजीवनाची सतत जाणीव देअूं लागलों, तर काय होअील ? अेक तर त्या बाअीला मेल्याहून मेलं होअून ती घरांत आपल्याला कोंडून घेअील. न जाणो, जिवाचं बरंवाअीटदेखील करून घेअील; किंवा अशीच भाबडी अन् कमकुवत मनाची राहिली तर पुन्हा कुणा दुष्टाच्या कारस्थानाला बळी पडेल. म्हणजे फिरून तिला नांवं ठेवण्याची आपली तयारीच !

**रतन**– बरं बाअी ! तसं झालं तर तुझ्या अध्यक्षतेखाली तिचा जाहीर सत्कार करूं; मग तर झालं ?

**माणिक**– गंभीर विषयाची अशी चेष्टा करूं नको. तूं मघाशी म्हणालीस म्हणून मीं सांगितलं. अशा दुर्दैवी स्त्रियांशीं अत्यंत प्रेमानं वागून त्यांच्या पूर्वायुष्याची त्यांना आठवण न होअूं देणं हें अेक आपलं सामाजिक कर्तव्य आहे की नाही सांग ?

**रतन**– खरं आहे माणिक तुझं म्हणणं. हें मात्र मनापासून सांगतें आहें हं. चेष्टा नव्हे. अितरांचं राहूं द्या, पण मी तरी आजपासून तुझ्या सांगण्याप्रमाणं वागेन.

**माणिक**– बरं झालं माझ्या सांगण्याचा अितका परिणाम झाला तें.

**रतन**— कां नाही होणार तूं अितकं कळकळीनं पटवून दिल्यावर? पण काय ग माणिक, बाबासाहेब येतील का ग चंद्राबाअीला घरीं?

**माणिक**— तें बघायचं आता. बाअींचं कौशल्य तर तिथंच आहे.

**रतन**— बरं, चला जाअूंया. मंडळांत येणार आहेस ना? आज आपल्या शकुंताअीला निरोप द्यायचा आहे.

**माणिक**— हो, आलेंच ना. तूं हो पुढं. मी जरा या दुकानांत जाअून येतें. ( दोघी जातात )

[ पडदा ]

०००

## प्रवेश ३ रा

( स्थळ – अवंतीबाअींचें घर. यमू गात आहे. )

( राग जोगी, ताल दादरा )

**निरपराध बंदित मी**
**जन्मभरी जन्मवरी आता**
**बांधिला विवाह-पाश**
**रोधिला तयेंचि श्वास**
**काढितां नये तयासि, प्राण जरी जातां ॥ १ ॥**
**आढळतां प्रीतिभाव**
**मन वेडें घेअि धाव**
**जाणिव परि होय झणीं आपटतां माथा ॥ २ ॥**
**आशेची दिव्य ज्योत**
**नच उरली जीवनांत**
**अंधार हाय भवताली ग्रासितसे चित्ता ॥ ३ ॥**

**यमू**– ( ओंजळींत तोंड लपवून हुंदके देते )

**अवंती**– ( प्रवेश करून ) कोण यमू ? काय ग झालं ? वर बघ बघूं ! रडतेस कां ग अशी? (पाठीवरून हात फिरवून ) बोल ना?

**यमू**– ( वर पाहून हुंदका लपवीत ) कांही नाही बाअी...

**अवंती**– खरं सांग काय झालं तें. बोललं का तुला कुणीं ?

**यमू**– छे हो बाअी. कांही झालं नाही. बोलणार कोण मला अिथं ?

**अवंती**– मग रडत कां होतीस तर ? हें बघ यमू, अुगीच बनवाबनवी करूं नको. मला काय अगदी वेडी का समजते आहेस तूं ? अलीकडे महिनाभर पाहातें आहें मी. अशीच चमत्कारिक वागते आहेस. आलीस त्या वेळीं पिंजऱ्यांतून बाहेर पडलेल्या पाखरासारखी किती आनंदांत होतीस ! मलाहि मनांत समाधान वाटलं. म्हटलं या मुलीला आणल्यासारखं तिचं कांही बरं होअील. पण आताशा बघावं तर असं ! कंटाळा तर आला नाही ना तुला अिथं राहायचा ?

**यमू**– मला कंटाळा कसा येअील बाअी ? तुमच्याबरोबर मी अिथं आलें ती अनश्चित मनानंच. तोंपर्यंत लोकांचा जो वाअीट अनुभव आला तो असा होता, की जगांत माणुसकी अन् अंतःकरण म्हणून कांही चीज असेल असं वाटतच नव्हतं मला. पण तुमच्या प्रेमळ वर्तनानं मला माणसांत आणलं. जीवनांत आशा अुत्पन्न केली. अेखाद्या पाठच्या बहिणीसारखं तुम्ही मला वागवतां आहां. अिथं येणाऱ्या अितर मुलींपासून मला त्रास होअूं नये म्हणून तुम्ही कितीतरी जपतां आहां. काय कमी आहे मला अिथं ? खायला, प्यायला अन् ल्यायला करशाला म्हणून कमतरता नाही. असं असतांना......

**अवंती**– मग कां बरं वाअीट वाटतं आहे तुला ?

**यमू**– बाअी, तेवढं मात्र विचारूं नका मला. (पुन्हा गहिवरते)

**अवंती**– कां बरं यमू ? माझा विश्वास नाही का तुला ? तसं असेल तर माझा आग्रह नाही.

**यमू**– बाअी, नका हो असं बोलूं. तुमच्या प्रेमळ अंतःकरणाची अन् माझ्याविषयीच्या गाढ सहानुभूतीची मला कांहीच का जाणीव नाही? पण बाअी, कसं सांगूं तुम्हाला माझ्या अंतःकरणांतलं दुःख? काय म्हणाल तुम्ही मला? बाअी, सगळं सोसवेल मला; पण तुमचा तिरस्कार...

**अवंती**– अग, पण मी तुझा तिरस्कार करीन असं वाटलं तरी कसं तुला? अन् केलं आहेस तरी काय तूं असं तिरस्कार करण्यासारखं? अं? सांग बेटा. लाजूं नको. मनांतलं दुःख मनांतच ठेवल्यानं तें वाढीला लागतं. पण तें बोलून दाखवलंस तर त्यावर कांही अुपाय नाही का करतां येणार?

**यमू**– अुपाय! बाअी, कसला अुपाय आला आहे त्यावर? काय आशा आहे या जीवनांत? विधवेचं जिणंसुद्धा बरं यापेक्षा! नादान नवऱ्याच्या नांवानं गळ्यांत बांधलेलं हें मंगळसूत्र गळ्यांत असेपर्यंत... (ओंजळींत तोंड लपवते)

**अवंती**– म्हणजे ग काय यमू?

**यमू**– बाअी, आपल्या मंडळांत विश्वनाथ येतात ना...

**अवंती**– हो, माहीत आहेत. घड्याळाचं दुकान आहे त्यांचं. मग त्यांनी का तुला कांही त्रास दिला? पण तो चांगला मनुष्य आहे असं वाटत होतं मला.

**यमू**– ते कशाला त्रास देतील? अुलट त्यांचं माझ्यावर प्रेम...

**अवंती**– काय? प्रेम आहे म्हणतेस? अन् तुझंहि अुलट त्यांच्यावर आहे, होय ना?

**यमू**– (शंकित मुद्रेने पाहाते) होय बाअी! रागावलां नाही ना तुम्ही? क्षमा करा माझ्या मनाच्या दुबळेपणाबद्दल. तुम्ही माझ्यावर खूप माया करीत आलांत. गंजून चाललेल्या माझ्या बुद्धीला अन् कर्तृत्वाला हवं तसं वळण दिलंत. भविष्यकाळाचं अुज्ज्वल चित्र

माझ्यासमोर अुभं केलंत. तरी तेवढ्यानं माझ्या मनाचं समाधान झालं नाही. झाडाच्या मुळानं खडक-कपारींतून पाण्याचा शोध करावा, तसं माझं भुकेलं अंतःकरण प्रीतीचा... तरुण पुरुषाच्या प्रीतीचा शोध घेत होतं. माझं मलासुद्धा पहिल्यानं तें कळलं नाही. अन् जेव्हा समजून आलं तेव्हा फार अुशीर झाला होता. बाअी, बाअी, सारा माझाच का हो दोष आहे यांत ?

**अवंती**– चल, वेडी कुठली ! त्यांत ग कसला आला आहे दोष ? अन् हें सांगायलाच का लाजत होतीस अितकी ? खुळी नाहीतर.

**यमू**– बाअी, तुम्ही रागावलां असतां तर...

**अवंती**– अग वेडे ! रागावेन कशासाठी ? प्रत्येक माणसाला प्रीतीची तहान लागलेली असतेच. आयुष्यांत अितर कोणतींहि सुखं मिळालीं तरी खऱ्या प्रेमाच्या प्राप्तीखेरीज माणूस अतृप्तच राहातं. आजवर तुला त्या प्रेमाचा लाभ झाला नव्हता. विश्वनाथांच्या सह-वासांत तुला जें हवं होतं तें आढळलं, तूं त्यांच्याकडे आकर्षित झालीस, यांत अस्वाभाविक असं काय आहे ?

**यमू**– बाअी, किती थोर आहे तुमचं मन ! स्वतः समाजसेवेचं कंकण हातीं बांधून त्यागी वृत्तीनं वागत असतां अितरांच्या मनाचा किती हळुवार विचार करतां तुम्ही ?

**अवंती**– यमू, विनाकारण मला मोठेपणा देअूं नकोस. मीं हें अेकाकी आयुष्य सुखासुखी पतकरलं आहे असं का तुला वाटतं ? वेडे, तुझ्यासारखी मी तरुण होतें तेव्हा मलाहि भावना होत्या. आपल्या आवडीच्या कुणा तरुणावर जिवाभावानं प्रेम करावं, त्याच्या जीवनांत आपलं जीवन संपूर्ण मिसळून टाकावं असं मलाहि वाटत होतं.

**यमू**– मग काय झालं बाअी ?

**अवंती**– काय झालं ! माझे वडील सरकारी अंमलदार होते. शिवाय नांवाजलेलं प्रख्यात घराणं आमचं. मी त्यांची मोठी मुलगी.

लग्नाच्या वयांत आल्यावर आजूबाजूच्या लोकांनी जीं कांही स्थळं सुचवलीं तीं बाबांना आपल्या तोलाचीं वाटलीं नाहीत. अुलट जीं बडीं घरं असत त्यांचा हुंड्याचा अन् मानपानाचा हव्यास पुरवणं बाबांच्या शक्तीबाहेर होतं. दिवसामागून दिवस जाअू लागले. मला वाटे, जीं माणसं मला पतकरायला तयार आहेत त्यांपैकी अेखाद्याला देअून कां टाकीत नाहीत मला बाबा? अेखाद्या तडफदार बुद्धिमान अशा गरीब तरुणाचा संसारसुद्धा नमुनेदार करून दाखवीन, अशी अुमेद होती मला.

**यमू**–मग तुम्हीं हें सांगितलं कां नाही तुमच्या वडिलांना?

**अवंती**–अग, पंधरावीस वर्षांपूर्वीची गोष्ट आहे ही. आजसुद्धा मुलींना जें धैर्य होत नाही तें त्या वेळीं कुठून असणार मला? अशांतच बाबा वारले! त्या वेळीं मी नुकतीच पदवीधर झालें होतें. लहान भावंडं आणि आअी यांचा संभाळ करण्याची सारी जबाबदारी माझ्यावर येअून पडली. तो विस्कटलेला संसार स्थिरस्थावर करीपर्यंत माझं तारुण्य संपून गेलं. चरितार्थासाठी नोकरी अन् मनाला विरंगुळा म्हणून सामाजिक कामं मीं मागं लावून घेतलीं: अन् त्यांतच समाधान मानतें आहें झालं.

**यमू**– पण का हो बाअी, प्रेम कांही अमुक वर्षांपर्यंतच निर्माण होतं असं का आहे? तरुणपणीं अेखाद्याला तें लाभलं नाही म्हणून पुढं काय त्याची आशाच खुंटावी?

**अवंती**–तसं कधी म्हटलं मीं? पण तें थोडं कठीण जातं अेवढं खरं. कारण अितक्या मोठ्या वयाच्या स्त्रीशीं कुणी झालं तरी जरा आदबीनं अन् गंभीरपणानंच वागणार. अेकमेकांचा जिव्हाळा अुत्पन्न व्हायला मनाचा मोकळेपणा अन् खेळकर वृत्ति या वयांत कशी निर्माण होणार? थोडक्यांत म्हणजे आपल्या वयाला साजण्याजोगं विरक्तपणाचं नाटक आम्हांला करावं लागतं. अन् आम्ही हें नाटक करीत असतों म्हणून तर आमच्याशीं सर्वजण बिचकून वागतात.

**यमू**–बाअी, किती शांतपणानं आपल्या भावना अुकलून दाखवतां तुम्ही! अेखाद्या कुशल डॉक्टरनं अेखादं अवघड ऑपरेशन सफाअीदार रीतीनं करावं तसंच. अन् मी वेडी आपल्या भावनांचं कोडकौतुक करीत होतें! बस्स! आजपासून मनाचा अगदी निश्चय केला आहे. विश्वनाथांचा विचारसुद्धा मनांत आणायचा नाही!

**अवंती**–वेडे पोरी! प्रेम विसरणं अितकं जर सोपं असतं तर आणखी काय हवं होतं?

**यमू**–(पुन्हा रडकुंडीस येअून) बाअी, काय करूं हो मग मी? मनाशीं पुष्कळ झगडा करून पाहिला; पण... विश्वनाथांशीं अेक शब्दहि बोलायचा नाही, त्यांच्या दृष्टीलादेखील पडायचं नाही असा मी निश्चय करतें; पण बाहेरच्या बाजूला त्यांची चाहूल अैकूं आली की मन अुतावीळ होअून जातं अन् कांही सुचेनासं होतं. निश्चय मागं खेचीत असतो, तर त्याच वेळीं मन म्हणत असतं, की कांहीतरी काम काढून बाहेर जातां येत नाही का तुला? मनाच्या अशा ओढाताणींत पावलं दाराकडे केव्हा वळतात तें सांगतांदेखील येत नाही. अन् अेकदा त्यांचा चेहरा दृष्टीला पडला, ती मृदु आर्जवी भाषा कानांवर पडली की माझा निश्चय कुठच्या कुठं वाहून जातो! बाअी, विचार करून मला वेड तर नाही ना लागायचं?

**अवंती**–दुबळेपणानं असा विचार करीत बसलीस तर मात्र खास लागेल.

**यमू**–मग माझ्या हातांत दुसरं काय आहे?

**अवंती**–आहे, सारं तुझ्याच हातीं आहे. तसं वागायची तयारी आहे तुझी? नव्हे, तुम्हां दोघांची?

**यमू**–काय तें सांगा बाअी!

**अवंती**–सांगतें. पण तुला अेकटीला नाही. विश्वनाथांना बोलावणं पाठीव आधी. (यमू जाते व दीनदुबळी झालेली चंद्रा खाली तोंड घालून प्रवेश करते)

**चंद्रा**– आओी, केव्हा आलांत तिकडून?

**अवंती**– ही आत्ताच.

**चंद्रा**– मग काय म्हणाले ते ? घरांत घ्यायचं केलं का कबूल त्यांनी?

**अवंती**– अग, अितक्या घाओीघाओीनं का असलीं कामं होत असतात? मीं त्यांना पुष्कळ प्रकारानं समजावून सांगितलं आहे. ते निश्चल बसलेले पाहिले अन् मुकाट्यानंच निघून आलें. म्हटलं त्यांना विचाराला थोडासा वेळ द्यावा.

**चंद्रा**– तुम्हीं त्यांना सांगितलं ना, की मी आता पूर्वीची राहिलें नाही म्हणून? खरंच, अगदी चांगली चांगली वागेन मी त्यांच्याशीं. अगदी ते मांगतील तसं.

**अवंती**– कांही काळजी करूं नको. मीं हें सगळं अगोदरच सांगितलं आहे त्यांना.

**चंद्रा**– बाओी, तुमचे अनंत अुपकार आहेत माझ्यावर. जन्म दिलल्या आओीनं...

**म्हाळसा**– (प्रवेश करून) अगबाओी, माझी चंद्री! (जवळ जाते)

**चंद्रा**– (खवळून) दूर हो चांडाळणी! माझ्या जन्माचं वाटोळं केलंस तेवढं पुष्कळ झालं. यापुढं तोंडसुद्धा पाहणं नको तुझं.

**म्हाळसा**– चंद्रे, चंद्रे! अग, आओी ना तुझी मी?

**चंद्रा**– आओी कसली! वैरीण आहेस! जन्म देण्यापुरतंच काय आओीपण तुझ्यांत असेल तें असो! आपला कावा साधण्यासाठी मला आपलं हत्यार बनवलंस! वाटेल तशी वागलें तर कधी आळा घातला नाहीस. म्हणून... म्हणून ही गत झाली.

**म्हाळसा**– खरं आहे पोरी. माझाच जर अपराध आहे, तर तूं तरी कां दोष देअूं नयेस? सारा गाव छी थू करतोय्, मग तूं तरी कां सोडशील?

**अवंती**– अुगीच कशाला त्रास करून घेतां चंद्राबाअी ? त्यांचं तसं तुमचंहि चुकलं नाही का? मामींनासुद्धा त्यांच्या वागण्याचा पश्चात्ताप झालाय्. आता यापुढं दोघीहि मायलेकी शहाणपणानं वागा म्हणजे झालं. जा तिकडे पलिकडे जाअून बसा निवांतपणीं बोलत. ( दोघी जातात )

**यमू**– बाअी, विश्वनाथ आले आहेत.

**अवंती**– होय का ! चल तर मग माझ्याबरोबर. ( जातात. माणिक व रतन प्रवेश करतात )

**माणिक**– बाअी ! यमूताअी ! कुणीच नाही वाटतं अिथं ?

**चंद्रा**– (प्रवेश करून पण तोंड लपवीत) कोण तें ? बसा हं, येतील बाअी अितक्यांत. बाहेर बोलत आहेत कुणाशीं. ( माणिक रतनला डिवचते. दोघी नेत्रपल्लवी करतात. माणिक हळूच– ' हं, रतन, केलेला निश्चय लक्षांत आहे ना ?' असें म्हणते. त्यास रतन– ' खरंच, माणिक, मी विसरणार होतें !' असें अुत्तर देते )

**रतन**– कां चंद्राबाअी, आंत कां चाललां ? बसा ना अिथं.

**चंद्रा**– बसूं कशी ? काम आहे. विडे लावायचे आहेत.

**माणिक**– मग अिथंच आणा ना. सगळ्याजणी मिळूनच लावूं की. ( चंद्रा जाते )

**रतन**– किती ग बदलून गेली आहे ? पहिला नाचरेपणा अन् मस्ती राहिली नाही मुळीच.

**माणिक**– कशी राहील ? पुनर्जन्म झालाय् तिचा आता. म्हणून मी तुला म्हणत होतें...

**शकू**– ( प्रवेश करून ) काय म्हणत होतीस ?

**रतन**– की अेका माणसाला आजकाल फार गर्व चढलाय् म्हणून.

**शकू**– तो कशासाठी ग ? रतनला कुणी पारखी मिळाला की काय परीक्षा करायला ?

**माणिक**– म्हणजे ही काय भानगड आहे आणखी रतन ? तरीच म्हटलं तूं अन् पारखी नेमके कसे पार्टनर होतां बॅडमिंटनला ! अशी भानगड आहे होय ?

**रतन**– बरं होय. असूं दे भानगड ! अन् शकू, माणिकलादेखील अेक सुवर्णाचं कोंदण मिळालं आहे, तें आहे का ठाअूक तुला !

**शकू**– अं बाअी ! डॉ. सुवर्ण की काय ? शाब्बास !

**माणिक**– चल ग, अुगीच काय वाटेल तें सांगतेस ? अे, कांही नाही ग शकू.

**शकू**– अग, पण असलं म्हणून बिघडलं कुठं ?

**रतन**– अेकांत अेक समारंभ अुरकून जाअील म्हणतेस ?

**शकू**– होय ना. मग काय ? सांगूं बाअींना ?

**माणिक**– अे. नको ग. आमचं कांही अजून नक्की नाही झालं.

**शकू**– म्हणजे व्हायच्या बेताला आलं आहे, होय ना ? बरं बाअी ! तुझ्यासाठी स्वतंत्र समारंभ करूं; मग तर झालं ? ( चंद्रा विड्यांचें तबक घेअून येते. सार्‍याजणी विडे लावूं लागतात तों यमूसह अवंतीबाअी येतात. )

**अवंती**– जमल्या का ग सार्‍याजणी ? अग, पण रेखा नाही वाटतं आली अजून ?

**रेखा**– ( प्रवेश करून ) आलें हो आलें. अुशीर झाला का मला ?

**सखू**– ( पाठोपाठ येअून ) तरी मी ताअीस्नी कवाची म्हनतीया पर त्येंचं बोलनं कुठं संपतंया ?

**अवंती**– कुणाशीं ग अेवढं बोलत होतीस ?

**रेखा**– बाबांशीं. किती वेळ तरी मीं त्यांची समजूत घातली ! अन् सांगायचं म्हणजे चंद्राबाअींनाच नव्हे तर माअीलासुद्धा घरीं घेअून यायला सांगितलं आहे त्यांनी.

**म्हाळसा**– ( बाहेर येत ) काय? घरीं यायला सांगितलंय् जावयांनी चंद्रीला अन् मला ?

**चंद्रा**– खरंच का हे रेखाताअी ? तुम्हीं दोघींनी माझ्यासारख्या मूर्ख, चुकलेल्या पोरीला फिरून घरांत अन् माणसांत आणलंत... कसे अुपकार फिटतील हे ?

**अवंती**– अुपकार कसले त्याचे चंद्राबाअी ? अितक्या अुशिरा तुम्ही सावध झालांत. मामी, तुम्हीहि यापुढं नीट वागून भलेपणा मिळवा म्हणजे झालं !

**रतन**– बरं, मग आता मांडामांडी करायला लागायचं का फराळाची ?

**माणिक**– कां ग ? फार भूक लागलीय् वाटतं !

**अवंती**– अग मुलींनो ! तुम्हांला आता आणखी अेक बातमी सांगतें. रंगरावाच्या केसचा निकाल नुकताच लागला. त्याला सर्व आरोपांखाली मिळून वीस वर्षांची शिक्षा झाली आहे.

**सखू**– फाशीं नाही का दिला मेल्याला ?

**चंद्रा**– आजवर केलेल्या पापाचे घडे भरले मेल्याचे !

**शकू**– बसूं द्या आता खडी फोडीत !

**अवंती**– त्याला शिक्षा झाली तें ठीक झालं ग; पण त्यामुळं यमूसारख्या हुषार अन् गुणी मुलीचा जन्म मातीमोल झाला त्याची वाट काय ?

**रतन**– पण त्याला आता काय करायचं ?

**माणिक**– नवरा कसला मेला ! पूर्वजन्मींचा वैरीच म्हणायचा !

**शकू**– बाअी, कसला हो हा आपला कायदा ? जन्मांत ज्याची आशा नाही, त्याच्या नांवानं खडे फोडीत जन्म काढायचा !

**सखू**– आमच्यांत नाही बा असलं. नोटीस दिली कागदांत की काडी मोडूनशेनी मिळतीया.

**रेखा**– खरंच सखू. त्या दृष्टीनं विचार केला तर तुम्ही अडाणी लोकच आमच्यापेक्षा अधिक सुधारलेले आहां.

**म्हाळसा**– खरंच बाअी, तुमचा तो काडीमोडीचा कायदा होणार आहे ना आता ?

**चंद्रा**– कुठला होतोय्. तोंपर्यंत अशा कितीक निरपराधी मुलींचे बळी पडतील !

**शकू**– तें कांही नाही बाअी. आपण साऱ्या बायकांनी मिळून बंडच केलं पाहिजे बघा या कायद्यासाठी.

**अितर सर्व**– खरं आहे शकूताअीचं म्हणणं.

**अवंती**– असं का ? मग तसल्या अेका बंडाची यमूताअी पुढारी होणार आहे. तुम्ही तिला मदत कराल ना ?

**सर्व**– हो हो ! जरूर करूं ! पण बंड म्हणजे करणार काय यमूताअी ?

**अवंती**– ती लग्न करणार आहे विश्वनाथ पंडितांशीं.

**म्हाळसा**– काय लग्न ? नवरा जिवंत असतांना ?

**शकू**– कायदा कुठं आहे तसा ?

**सखू**– आन् आपला धरम बी काय सांगतुया ? आता नवरा मेल्यावर दुसरं लगीन तुमच्यांत बी करूं लागल्यात्या बायका. पन जिचा न्हवरा जिवंत हाय तिचं लगीन कसं व्हायाचं ?

**रतन**- खरंच, ही कल्पना कशीशीच वाटते बाअी मनाला !

**अवंती**– हें पाहा, धर्माबद्दल म्हणाल, तर 'नष्टे मृते... ' या वचनानं स्पष्ट परवानगी दिली आहे अशा लग्नाला. डॉ. देशमुखांनी तीचं आधार घेअून बिल आणलं नव्हतं का ?

**माणिक**– पण तो कायदा पास कुठं झालाय् ? त्याखेरीज दुसरं लग्न कायदेशीर होत नाही.

**अवंती**– मग मीं बंड करायचं म्हटलं तें याचसाठी. जे निर्बंध आपल्याला जाचक अन् अन्यायाचे आहेत ते काढून टाकण्यासाठी सनदशीर प्रयत्न तर करायचेच; पण तोंपर्यंत त्यासाठी सत्याग्रह करायलासुद्धा धैर्यानं पुढं यायला हवं. यमू अन् विश्वनाथ या गोष्टीला तयार आहेत. तुम्हांला जर या विषयाची मनापासून कळकळ असेल, तर या वेळीं खरी सहानुभूति तुम्हीं दाखविली पाहिजे. (क्षणभर स्तब्धता )

**रेखा**– खरं आहे बाअी तुमचं म्हणणं ! यमूच्या विवाहाला आमची अंतःकरणपूर्वक संमति आहे. ( सर्वजणी– ‘ यमूताअी ! आम्ही तुझं अभिनंदन करतों ! ’ असें म्हणतात )

**यमू**– तुम्हीं सगळ्यांनी पाठिंबा दिला म्हणून मला या गोष्टीला तयार होण्याचं धैर्य येअील. तुमच्या सहानुभूतीबद्दल खरोखर आभारी आहें मी तुमची.

**शकू**– आता मात्र खरा रंग आला हं समारंभाला.

**अवंती**– हो, पण कशामुळं बरं मुलींनो ? तुम्हीं साऱ्यांनी परिस्थितींतून नवी वाट काढायचं ठरवलंत म्हणूनच. वास्तविक विवाहसंस्थेचा हेतु किती अुदात्त अन् पवित्र. परस्परानुरूप अशा तरुणतरुणींनी विवाहविधीनं अेकत्र यावं आणि परस्परांच्या प्रेमाच्या बळावर आपल्या कुटुंबाचं अन् राष्ट्राचं कल्याण करावं अशा विचारानं विवाहसंस्था अस्तित्वांत आली.

**यमू**– पण आजच्या लग्नपद्धतीकडे पाहिलं म्हणजे त्या पद्धतीचं विडंबन चाललं आहे असं वाटायला लागतं. ज्या प्रेमाच्या पायावर पुढं सारी अिमारत अुभी राहायची, तें प्रेमच जर नवराबायकोंत नसलं किंवा पुढं नाहीसं झालं तर संसार सुखी व्हायचे कसे ? असं निष्प्रेम, दुर्दैवी आयुष्य कंठणारीं माणसं म्हणजे समाजाच्या पायांखालचे सुरुंगच ! केव्हा कसे पेट घेतील अन् वरची अिमारत ढासळून पाडतील याचा नेम नाही लागायचा ! या परिस्थितीचा विचार कुणीं करायचा ?

**अवंती**– तुम्हीं तरुण मुलांमुलींनीच. तुम्हीं तो करायचं ठरवलंत, स्वतःचं सुख आणि समाजाचं स्वास्थ्य ज्या विवाहानं साधतं, त्याला आजची पद्धति अुपयोगी पडत नाही असं दिसतांच नव्या वाटेनं जाण्याचं धैर्य दाखवलंत याबद्दल विचारी लोक तुमचं अभिनंदनच करतील. (टेलिफोनची घंटा वाजते.) रेखा, बघ बाअी कुणाचा फोन आहे तो!

**रेखा**– हॅलो! कोण? सुरेश...सुरेश...काय अैकतें आहें मी हें? खरोखरच का तुम्ही आहां? म्हणजे...गाडींतून अुतरतांच बाअींनी फोन करायला सांगितलं होतं? अगबाअी! म्हणजे तुम्ही येणार तें त्यांना माहीत आहे तर? सुरेश, सुरेश...लौकर या! वेळ लावायचा नाही हं. (रिसीव्हर टाकून बाअींना मिठी मारते) बाअी, बाअी! कसा लागला तुम्हाला सुरेशचा पत्ता? अन् हें मला आत्तापर्यंत कां नाही सांगितलं? कित्ती कित्ती वाअीट आहां तुम्ही!

**अवंती**– (तिच्या पाठीवरून हात फिरवीत) तें सारं आता सावकाश सांगेन मी. पण मुलींनो! तुम्ही आधी आजच्या समारंभाला आता सुरवात करा पाहूं. नाहीतर हिचे सुरेश आता येतील अन् मग ही पोरगी कसली सापडते आहे आपल्याला!

**रेखा**– (लाजून) अिश्श! हें हो काय बाअी?

**माणिक**– (गाणें म्हणूं लागते)

(राग-- मालकंस)

**होवो धन्य संसार हा ॥ ध्रु० ॥**
**दिसला झाला**
**पथ बिकट जो जुना**
**मार्ग शोधिला**
**हा नवा ॥ १ ॥**

[ पडदा ] ★ ★ ★